


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



---

**प्रकाशन : त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर, गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे, आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तसेच मैसूर येथील भारतीय भाषासंस्थान यांचेही अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन आणि भारतीय भाषासंस्थान सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा,
**प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

संपादकीय

# मूकं करोति वाचालम् । पंगुं लंघयते गिरिम्

"मूकं करोति वाचालम् । पंगुं लंघयते गिरिम्" हे ध्येय असणाऱ्या मुंबईच्या "नाट्यशाला चॅरिटेबल ट्रस्ट"च्या कार्याची माहिती कळल्यानंतर ध्वनिमाध्यमातून बोलल्या जाणाऱ्या आपल्या भाषेचा, तिच्यामार्फत होणाऱ्या संदेशनाचा आणि भाषेच्या माध्यमातून होणाऱ्या कलाविष्काराचा अभिमान गळून पडला. "नाट्यशाला", ट्रस्टच्या संचालक विश्वस्त कांचन सोनटक्के यांनी १९८०च्या आसपास कर्णबधिर, अंध आणि अपंग मुलांसाठी नाट्याभिनयाची चळवळ सुरू करून सर्जनशील बालनाट्याला एक अपूर्व दिशा दिली. त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे शारीरिक व्यंग असणाऱ्यांसाठी किंवा भाषा वंचितांसाठी "अभिनय" हे, भावना-विचार पोहोचवण्याचे, सुसंवाद घडवून आणण्याचे एक प्रभावी माध्यम आहे, हे सप्रयोग दाखवून दिले.

सामान्यतः असे मानले जाते की, मानवाच्या जीवनात आनंद निर्माण करणाऱ्या, त्याचे जीवन समृद्ध करणाऱ्या आणि त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास करणाऱ्या संगीत, नृत्य, नाट्य, साहित्य इत्यादी कलांच्या अविष्कार-आस्वादात भाषा हा महत्त्वाचा घटक आहे. परंतु भाषा हा घटकच ज्यांच्या आयुष्यात सहजप्राप्त नसतो अशा मूकबधिरांच्या कलात्मक आनंदाचे काय? जे अपंग आहेत, अंध आहेत अशा मुलांच्या कलाविष्काराचे काय? किंवा कलाविष्कारातून घडणाऱ्या व्यक्तिमत्त्व विकासाचे काय? हे आणि असे प्रश्न आपल्याला पडतात का? तुम्हा आम्हांला पडत नसले तरी असे प्रश्न काही मोजक्या लोकांच्या मनात निर्माण होतात. कांचन सोनटक्के या अशांपैकीच एक आहेत. कांचनताईंना फक्त प्रश्न पडत नाहीत तर त्यांच्या संवेदनाक्षम मनाला कल्पनेचे पंख फुटतात आणि मग त्यांच्या कल्पना ध्वनिनिरपेक्ष भाषेच्या जगात संचारू लागतात. आणि त्या कल्पना साकारण्यासाठी 'नाट्यशाला' या संस्थेचा जन्म होतो. ही नाट्यशाला गेली २०-२२ वर्षे कर्णबधिर, अंध, अस्थिव्यंग, मानसिक कमतरता असणाऱ्या मुलांसाठी विविध उपक्रम राबविण्याचे कार्य सातत्याने करीत आहे.

सामान्य मुलांपेक्षाही व्यंग असणाऱ्या या मुलांचे मनोरंजन करावे, त्या मनोरंजनातून प्रबोधन तर व्हावेच परंतु समाजात त्यांना, त्यांची अशी ओळख प्राप्त

व्हावी, त्यांच्यातील आत्मविश्वास वाढावा आणि सर्वसामान्यांच्या मुख्य प्रवाहात त्यांचा आपल्या गुणवत्तेच्या बळावर समावेश व्हावा, या भूमिकेतून "नाट्यशाला" ही संस्था सर्जनशील नाट्यप्रशिक्षण देणाऱ्या कार्यशाळांचे आयोजन करते. सर्वप्रकारच्या अपंग विद्यार्थ्यांना मनोरंजनाद्वारे शिक्षण देणे आवश्यक आहे, किंबहुना ती त्यांची गरजच असते, असे एक तत्त्व त्या भूमिकेमागे आहे. कोणत्याही अभ्यासक्रमातील विषयाचे नाट्यीकरण केले तर तो भाग या मुलांना समजायला सोपा जातो, हे येथे होणाऱ्या प्रयोगांमधून सिद्ध झाले आहे. अशा शिक्षणामुळे या मुलांना मानसिक सबलता प्राप्त होते. आपल्यामधील उणीवांवर मात करण्यासाठी या मुलांना नाट्याभिनयाचा खूपच उपयोग होतो. आणि शारीरिक व्यंगामुळे निर्माण होणारा न्यूनगंडही नाहीसा होण्यास मदत होते.

सामान्य मुलांना येणारी भाषा, त्यातून येणारी संवादसुलभता या मुलांजवळ नसते. म्हणूनच नाट्य, अभिनय, सूर, ताल आणि लयबद्ध हालचाली यांच्याद्वारे त्यांचे विचार, त्यांच्या भावभावना व्यक्त होऊ शकतात, इतरांशी संवाद साधण्यासाठीही या गोष्टींचा उपयोग होऊ शकतो. त्यांची ही अभिव्यक्ती म्हणजे एकप्रकारे त्यांचा भाषाविष्काराच असतो, म्हणूनच ज्या मुलांना बोलता येत नाही त्यांच्यासाठी "अभिनय" हे शब्दातील अर्थ पोहचवण्याचे माध्यम बनते. शिवाय नाट्यमाध्यमाच्या अंगभूत ताकदीमुळे व्यंग असणारी मुले नाट्यविषयाशी समरसून जातात. एवढेच नाही तर शारीरिक आणि मानसिकरीत्या एकवटून कामाला लागतात, असा कांचनताईंचा अनुभव आहे. त्यांच्या मते, कर्णबधिरांच्या स्वरयंत्राच्या किंवा बोलण्याच्या विविध सरावांच्यापेक्षा, व्यायामांपेक्षाही भाषाविकासासाठी अभिनयाचा सराव अधिक उपयुक्त ठरू शकतो. "नाटक स्वतःला ओळखायला शिकवते" या सिद्धांताचा प्रत्यय नाट्यशाळेच्या शिबिरांतून किंवा नाट्यप्रयोगांतून नेहमीच येतो.

नाटक ही एक सांघिककृती असल्याने नाटक करणाऱ्या मुलांमध्ये एकात्म भाव वाढण्यासाठी मदत होते. त्याचप्रमाणे नाट्यकृतीतील सांघिक भावनेतून त्यांच्या मनाची ताकद तर वाढतेच शिवाय सर्जनशक्ती वाढण्यासाठीसुद्धा मदत होते. नाट्यातील क्रियाप्रतिक्रियांमधून त्यांची संवेदनक्षमता व कल्पनाशक्ती वाढते आणि त्यातूनच मेंदूची कार्यशक्तीही वाढीस लागते आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे नाट्याविष्कारातून आनंद देण्याघेण्याची प्रक्रिया सुरू झाल्याने त्यांचे जीवन समृद्ध होण्यास मदत होते. नाट्यातून व्यक्तिविकास घडवून आणण्याचे आपले हे प्रयोग अधिकाधिक मुलांपर्यंत पोहोचावेत म्हणून नाट्यशालेतर्फे या मुलांच्या शिक्षकांसाठीही

कार्यशाळांचे आयोजन केले जाते.

नाट्यखेळ, नाट्याभिनय, दिग्दर्शन, निर्मितीतंत्र, नाट्यलेखन, तालनाट्य, सर्जनशीलनाट्य इत्यादी विषय शिक्षकांच्या नाट्यशिबिरांमधून आणि विशेष कार्यशाळांमधून प्रात्यक्षिकांसह शिकवल्याने शिक्षकांना त्यांचा फार उपयोग होतो. या उपयुक्ततेची प्रचीती हे प्रशिक्षित शिक्षक जेव्हा आपापल्या शाळेतील मुलांसाठी छोट्यामोठ्या नाटिका लिहून त्या सादर करतात, तेव्हा येते. या छोट्यामोठ्या नाटिकांच्या यशस्वितेतूनच पुढे नाट्यस्पर्धांचे आयोजन करण्याची कल्पना सोनटक्के पतिपत्नींना सुचली, १९९५ साली जागतिक अपंगदिनानिमित्त महाराष्ट्र शासनाच्या साहाय्याने एक राज्यस्तरीय आंतरशालेय नाट्यस्पर्धा घेतली गेली. अर्थातच त्याला भरपूर यश मिळाले आणि तो उपक्रम आजही राबवला जातो. त्यात जवळजवळ १०० शाळा भाग घेतात. या नाटिकांची पुस्तकेही प्रसिद्ध झाली आहेत. जिज्ञासूंनी ती आवर्जून वाचावीत अशीच आहेत.

गेल्या वीसबावीस वर्षांच्या अथक प्रयत्नांमुळे कांचनताई आणि कमलाकर सोनटक्के यांना महाराष्ट्रातील आणि भारतभरातील अंधअपंगासाठी कर्णबधिरांसाठी काम करणाऱ्या खाजगी संस्थांमध्ये, सरकार दरबारी आणि सांस्कृतिक संस्थांमध्ये मान्यता मिळाली आहे. प्रतिष्ठित मानले जाणारे अनेक पुरस्कार त्यांना मिळाले आहेत. एवढेच नाही तर दोनतीन महिन्यांपूर्वी राष्ट्रपती अब्दुल कलाम यांच्या मुंबई भेटीच्या वेळी कांचन सोनटक्के यांनी दिग्दर्शित केलेला शारीरिक व्यंग असणाऱ्या बाल कलाकारांचा एक नाट्यप्रयोग मुंबई सरकारने मुद्दाम आयोजित केला होता. कांचनताईंच्या कामाचे महत्त्व यातून सहज लक्षात येते.

प्रारंभी म्हटल्याप्रमाणे पांगळ्याला पाय, मुक्याला वाचा आणि आंधळ्याला डोळा देणाऱ्या बालरंगभूमीवरच्या या चळवळीची माहिती कळल्यानंतर ध्वनिमाध्यमातून बोलल्या जाणाऱ्या मानवी भाषेचा, भाषेच्याद्वारे होणाऱ्या संज्ञापनाचा आणि भाषेच्या माध्यमातून होणाऱ्या कलाविष्काराचा अभिमान गळून पडला तर नवल नाही. आणि म्हणूनच "व्यक्तिविकासाय कलाशिक्षा" हे ब्रीद सार्थ करणाऱ्या नाट्यशालेतील प्रयोगांचा प्रचार आणि प्रसार करणे हे सर्व अव्यंग भाषकांचे कर्तव्य आहे, असे म्हणावेसे वाटते.

■

**मृणालिनी शहा**

# "अक्षर - निधानाचे अमृत-कुम्भ" : विद्यावाचस्पती अमृत माधव घाटगे

**मो. गो. धडफळे**

**मराठीत न लिहिणारा मराठी बोलींचा अभ्यासक :**

'भाषा व जीवन' या त्रैमासिकेच्या नावातील 'भाषा' व 'जीवन' हे दोन्ही शब्द सामान्य व म्हणून व्यापक अर्थांचे वाचक आहेत. एखादी 'विशिष्ट' भाषा किंवा कोणा एकाचे 'विशेष' जीवन त्यात अभिप्रेत नाही. तरीही या त्रैमासिकाचे माध्यम मराठी ही भाषा आहे. माझ्या संशोधन-प्रबंधाचे मार्गदर्शक संस्कृत-प्राकृत पंडित व थोर भाषाशास्त्रज्ञ डॉ. अमृत माधव घाटगे यांनी व्याख्यानांसाठी वा लेखनासाठी मराठीचा जवळजवळ कुठेच वापर केला नाही. त्यांच्या लेखनाचे माध्यम कायम इंग्रजीच होते. पण मराठीच्या विविध बोलींसाठी त्यांनी केलेले शास्त्रीय लेखन मात्र मराठीच्या अभ्यासकाला कायमचे मार्गदर्शक ठरेल असे आहे. कर्नाटकातील दक्षिणकोकणी, कुडाळी, महाडची कुणबी, काणकोणची कोकणी, ठाण्याची वारली आणि मराठी विभाषांविषयीचा त्यांचा ग्रंथ (पुणे १९७१) हे मराठीच्या अभ्यासाला असणारे त्यांचे अजोड योगदान आहे. हिंदीतील ध्वनिम (Phonemic) व रूपिम (morphemic) यांच्या वारंवारितेविषयीचा (Frequencies) त्यांचा लेख असाच लक्षणीय आहे.

**भाषानदीचे मूळ शोधणारा संशोधक :**

हिंदी व मराठी या आधुनिक प्रांतीय भाषांच्या मूलगामी अभ्यासासाठी प्राकृतांची भक्कम बैठक हवी. प्राकृतांच्या अभ्यासासाठी विदग्ध संस्कृत व वैदिकी या भाषांचे सर्वांगीण ज्ञान हवे. या संस्कृतासाठी युरो-भारतीय भाषाशास्त्राचे मार्मिक आकलन हवे व त्यासाठी एकूणच ऐतिहासिक भाषाशास्त्रावर प्रभुत्व हवे. एवढे सगळे एका व्यक्तीला उत्तम रीतीने सिद्ध झाल्याचे आपल्याला घाटगे यांच्या लेखनावरून अनुभवाला येते. त्यातच संस्कृत व प्राकृत या भाषांचे कोशशास्त्र (Lexicology) व कोशलेखन (Lexicography) यात केवढी अवधाने, केवढे बारकावे, केवढी तंत्रे सांभाळावी लागतात हे डेक्कन कॉलेजच्या महत्त्वाकांक्षी

ऐतिहासिक भाषाशास्त्राच्या तत्त्वांनुसार तयार करण्यात येणाऱ्या विश्वकोशात्मक संस्कृत कोशांचे जे प्रथम दोन खण्ड व पृ. १६५४ पर्यंतचा तिसरा खण्ड व भांडारकर-प्राच्य-विद्या संशोधन संस्थेतर्फे तयार करण्यात येणाऱ्या जैन धार्मिक साहित्याचा दृष्टिकोण बाळगून रचण्यात येणाऱ्या प्राकृत कोशाच्या प्राथमिक व कायमच्या दिग्दर्शक अशा खण्डांवरून जगातील सर्व संस्कृत-प्राकृत अभ्यासकांच्या पूर्णपणे ध्यानात आले आहे. जागतिक स्तरावर त्याची सुयोग्य प्रशंसाही झाली आहे. एखादा व्यासंगी प्राज्ञ किती आडवे-उभे, उंच-खोल ज्ञान प्राप्त करून घेऊ शकतो हे डॉ. घाटगे यांच्या उदाहरणावरून कळते. बंगालीत 'भीषण बिद्‌बान्' म्हणतात तसे 'भाषाशास्त्रातील भीष्माचार्य' अशीच या सात्त्विक, वैष्णव, व्यासंगी अभ्यासकाविषयी 'आ-दर (डर)' युक्त भावना (awe-inspiring) निर्माण होते. 'सर्वज्ञः स हि माधवः' हे जितक्या परीने खरे आहे तितक्याच परीने 'सर्वज्ञः स हि माधवसुतः' असेही म्हणायला हरकत नाही. नाहीतरी औपनिषदिक धारणांनुसार 'आत्मा वै पुत्रनामासि' अशीच स्थिती आहे. घाटगे सरांच्या वडिलांचे नाव 'माधव' होते. 'मनुस्मृतीतील निर्वचने' हा सरांचा एक उत्तम उद्‌बोधक लेख वाचताना मनुस्मृतीवरील मेधातिथीचे एक वाक्य या संदर्भात सरांनीच उद्‌धृत केले आहे. त्याची मला नेहमी आठवण होते. मनुस्मृती (१.१०) वर भाष्य करताना मेधातिथि म्हणतो 'दृश्यते हि पितृशब्दोऽपत्ये' (पित्याच्या नावाचा वाचक शब्द मुलाच्या बाबतीत वापरलेला आढळतो.)

**शब्दार्थ शोध :**

'नारायण' शब्दाचा अर्थ मनू सांगतो. पाण्याला 'नारा' म्हणतात. 'आपो नारा इति प्रोक्ताः'. वस्तुतः अप् या स्त्रीलिंगी रूपाचे विशेषण 'नारी' असे ईकारान्त (ङिष्) रूप व्हायला हवे; 'नारा' असे आ-कारान्त (टाप्) नव्हे. पण संस्कृत भाषा याबाबत एकच एक धोरण ठेवत नाही. गायकचे स्त्रीरूप गायिका, नायकचे नायिका तर 'नर्तक'चे मात्र नर्तकी हे रूप होते; नर्तिका नव्हे.

'ओम्' या शब्दावर ज्ञानेश्वरांपर्यंतच्या तत्त्वज्ञांनी 'अ', 'उ' व 'म' (म्ह.म्) यांचा बराच तात्त्विक अर्थ सांगितला आहे. मनूने (२.७६) छांदोग्य. उप. (२.२३.२) डोळ्यासमोर ठेवून तीन वेदांची ही प्रतीकाक्षरे मानली आहेत. सरांनी मात्र ब्लोशला अनुसरून नेमका साधा अर्थ उलगडून दाखवला आहे. युरोभारतीय भाषांत अखेरचा दीर्घ स्वर (विशेषतः हाक मारताना होणारा प्लुत-स्वर) अनुनासिक होतो. थोडक्यात 'ओ' याचे 'ओम्' हे रूप झाले. बस्! मनूने मांस

भक्षणापासून लोकांना परावृत्त करण्यासाठी 'मां + स' अशी कोटी केली आहे. 'मला (मां) तो (स)' 'ज्याला मी', "ज्याला मी येथे (इहलोकी) खाईन तो मला तेथे (परलोकी) खाईल." सरांनी मांस (मूळरूप) याची ग्रीक mēros म्हणजे मांडी (leg piece), लॅटिन membrum (शरीरावयव), गोथिक mimz हे सर्व संबंध उलगडून दाखवले आहेत. वृषलादिक अनेक शब्दांच्या मूळ अर्थांसाठी हा लेख जरूर वाचावा. येवढे सगळे करून त्यांची धारणा मात्र अशी होती की 'निर्वचन शास्त्र हे फार अनिश्चित स्वरूपाचे (uncertain) आहे.' संस्कृत कोशातून निर्वचने वगळण्यात आली आहेत. प्राकृतकोशातही त्यांचा विवेकानेच स्वीकार झाला आहे व तोही सर्वत्र नाही.

एखादा ('भूत' नव्हे) पण 'अ-भूत' (अ-तथ्य) शब्द (ghost-word) भाषेत कसा दाखल होतो याची प्रचीती आणणारा सरांचा लेख 'उत्कलापय' या नोंदीविषयीचा आहे. बोटलिंग व रोठ, 'उद् + कलाप' '(मोराचा) वर उंचावून पसरलेला पिसारा' असा अर्थ करतात आणि 'रघुवंश' (१६.६४) व 'मृच्छकटिक' यातील (७.६३) उदाहरणे देतात.

बेनफे याला 'उद् + कल्' या धातूचे प्रयोजकाचे रूप मानतो. त्याचे दोन अर्थ त्याने बरोबर हेरले आहेत. 'पंचतंत्र' व 'वेतालपञ्चविंशतिका' याच दोन ग्रंथांच्या केवळ जैन-परंपरेतील हस्तलिखितांवरून (१) कोणाची तरी परवानगी मागणे व (२) पित्याच्या घरातून वधूला सासरी आणणे हे दोन अर्थ नोंदवले गेले आहेत. जैन 'भरटकद्वात्रिंशिका' (हर्टेलचे संपादन) यातील एक सुंदर कथा सर आपल्यापुढे आणतात. एक श्रमण शेतातून नेहमी ऊस पळवायचा. चोरीचे 'पाप' ठरायला नको म्हणून 'शेता, शेता, ऊस घेऊ का?' अशी परवानगी मागायचा. एकदा मालकाने त्याला 'रंगे हाथ' जरी नाही तरी 'गन्ने हाथ' पकडला. तो म्हणाला मी नेहमी शेताची परवानगी घेऊनच (मुत्कलाप्य) ऊस घेतो. म्हणजे एकतर मूळ शब्द 'मुत्कलाप्य' असा आहे; 'उत्कलाप्य' नाही. हेमचन्द्र त्याच्या देशीनाम-मालेत (६.१४७) हा 'उचित' व 'स्वैर' या अर्थांचा देशी शब्द (अ-संस्कृतोद्भव) आहे असे सांगतो. धनपाल, 'पाइअलच्छी' या कोशात 'मुक्कल' या नामाला 'आवे' हा प्राकृत प्रत्यय लावून 'मुक्कलावेइ' म्हणजे 'मोकळे करणे' असे रूप देतो. या प्राकृताचा कृत्रिम संस्कृत 'अवतार' (किंवा 'उद्धार') 'मुत्कलापयति' म्हणजे मराठी 'मोकळा' करणे, गुजराथीत 'मुकळावो', पण संस्कृतीकृत या तथाकथित प्राकृताच्याही मुळाशी पुन्हा 'संस्कृत'च असल्याचे डॉ. घाटगे दाखवून देतात. 'मुच्'

(‘सोडणे’) याचे क. भू.धा.वि.चे ‘मुक्त’ असे रूप होतेच व ‘मुंक्न’ (असेही) होत असावे. मराठीतील ‘मुकणे’ यात हा ‘मुक्न’ (हिं. मुकना) आहे. लेखाचा समारोप हेमचन्द्राने उदाहरण म्हणून दिलेल्या अपभ्रंश - गाथार्धाने सर करतात. “मोक्कलडेणं वड्डपणु परिपाविअइ हत्थिं” (मोठेपणा हा हात मोकळे करून दान दिल्याने येतो.) डॉ. घाटगे यांनी भाषाशास्त्र, कोशशास्त्र, हिन्दु-बौद्ध-जैन धर्म यांविषयीचे आपले बहुमोल संशोधन असेच मुक्तहस्ताने आपल्याला दिले आहे. माझ्यासारख्या त्यांच्या नशिबवान विद्यार्थ्यांना हे पथदर्शक लेखन म्हणजे ‘अमृत’ - ठेवा वाटतो.

**‘कर्तरि’ व ‘कर्मणि’ घाटगे :**

सरांच्या पदव्या, कारकीर्द, जीवन याविषयी माहिती मिळवायची असेल तर डॉ. वसिष्ठ झा यांनी त्यांना ‘विद्या-व्रतिन्’ या नावाने समर्पित केलेला इंग्रजी भाषेतील ‘प्रा. घाटगे अभिनंदनपर ग्रंथ’ (दिल्ली १९९२) हा पहावा. सरांच्या विपुल व अमोल लेखनाचा परिचय करून घेण्यासाठी ‘अमृत’ या नावाने कस्तूरभाई लालभाई स्मारक-निधीने अहमदाबाद येथे प्रकाशित केलेला लेखसंग्रह पहावा. या दोन ग्रंथांमधून, प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकरांच्या चाणाक्ष व्याकरणशैलीत अनुक्रमे ‘कर्मणि’ घाटगे व ‘कर्तरि’ घाटगे म्हणजेच थोडक्यात घाटगे ‘यांविषयीचे’ व प्रत्यक्ष घाटगे ‘यांचे’ लेखन आपल्याला अभ्यासिता येईल. हल्ली आमच्या संस्कृतच्या क्षेत्रात ‘संस्कृतमध्ये’ बोलण्याचे महत्त्व सांगण्यात येते. येवढे थोर घाटगे-मेहेंदळे यांसारखे संस्कृतावरील अधिकारी पण संस्कृतात बोलत नाहीत अशी खंत क्वचित व्यक्त होते. संस्कृतदिनाला प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित असतानाही घाटगे संस्कृतात तर सोडाच पण ‘साधे’ मराठीतही बोलले नाहीत. त्यांचे आपले ‘इंग्लिश’! हो. पण त्यांचे इंग्लिश खरोखरच किती कसदार आहे हे त्यांच्या लेखनावरून कळते. इंग्लिश ‘चांगले’ (म्ह. ‘आपले’ इंग्लिश. तशी इंग्लिश भाषा मुळात चांगली आहेच!) कळण्यासाठीही घाटगे-लेखन वाचावे. ‘ग्रीक व लॅटिन’ त्यांना कधीही ‘कानडे’ नव्हते. बौद्ध त्रिपिटक वाचण्यासाठी बर्मी (‘ब्राह्मी’ नव्हे; ‘ती’ ते वाचतच) व सिंहली लिपीही ते शिकले होते.

**प्रसिद्धीपासून पराङ्मुख :**

मोठ्या माणसांविषयी बोलताना ते ‘प्रसिद्धि पराङ्मुख’ असल्याचे व ‘सन्मान’ त्यांच्यामागे लागतात ते सन्मानांच्यामागे लागत नाहीत हे आवर्जून सांगितले जाते. हे सारे त्या त्या वेळचे ‘अर्थवाद’ असतात. अनेक जैन अध्यासने व पीठे

यांच्याकडून मिळालेले पुरस्कार आणि 'आचार्य हेमचन्द्र पुरस्कार' असे अनेक सन्मान मिळाले, मात्र त्याचे घाटगे सरांना खरोखरीच कधींच काही वाटले नाही. "धडफळे, I am only interested in what I am doing presently". प्राकृतला विसरून त्यांनी भाषाशास्त्राची पताका हाती घेतली, ती बाजूला ठेवून संस्कृत 'कोशात' स्वतःला पुरते गुरफटून घेतले, ते संपल्यावर संस्कृतनंतर प्राकृत या 'संस्कृतं प्रकृतिः' या न्यायाला अनुसरून ते प्राकृत कोशात शिरले आणि 'कोशस्थ' असतानाच इहलोकीचा निरोप घेऊन गेले. संस्कृतच्या व्याकरणासाठी मी ऑक्सफर्डने प्रकाशित केलेले "The Sanskrit Language' या टी. बरो यांच्या पुस्तकाची शिफारस करतो. अर्धमागधीसाठी मी सरांचे 'Introduction to Ardhamāgadhī' याची शिफारस करतो. 'मनोरथ' म्हणजे 'मनाचा रथ' नाही तर 'मनोऽर्थ' (मनाचा ध्यास, ध्येय, मनसुबा) याचे ते स्वरभक्तिपर रूप आहे, हे आणि अशा, कितीतरी नवनव्या गोष्टी या पुस्तकातून कळतात. 'कहाणियतिग' या तीन कथांच्या संपादित आवृत्तीत 'वीणा' (bin इजिप्शिअन् विनि) व 'द्वारका' इत्यादी ऐतिहासिक नगरांविषयीच्या, स्थलांविषयीच्या त्यांच्या नोंदी 'एनसायक्लोपेडिया ब्रिटानिका' किंवा 'एन. ऑफ रिलिजन ॲन्ड एथिक्स' या महाकाय कोशांमधील नोंदी दर्जेदार, विस्तृत, वास्तव-ऐतिहासिक व पूर्णतः शास्त्रीय नोंदींसारख्या आहेत. सर संस्कृतात बोलले नाहीत हे मी सांगितले, पण नोंदींसारख्या अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या अध्यक्षीय भाषणाचा त्यांचा समारोप अशा एका स्वकृत श्लोकार्धाने त्यांनी केला होता की मला तो उद्‌धृत केल्याखेरीज राहवत नाही. विनम्रपणाने "मी काही नवे सांगू शकलो नाही" असे म्हणत सरांनी जयन्तभट्टाच्या न्यायमञ्जरीतील एका श्लोकाचा चरण उद्‌धृत केला. "कुतो वा नूतनं वस्तु वयमुत्प्रेक्षितुं क्षमाः" आणि अतिशय कुशलतेने स्वकृत चरणाने श्लोक पूर्ण केला. "पूर्वसूरिविचाराणां विश्लेष एव नूतनः ।" खरेच आहे! सर संस्कृतमध्ये लिहिते तर त्या संस्कृतचा थाट असा असता.

**निर्भीड विद्वान :**

विद्वान हा प्रामाणिक व निर्भीड हवा. सरांची सर्व हयात जैनधर्म (कुन्दकुन्दाचार्य, तत्त्वार्थाधिगमसूत्रे) व जैन आगम शिकवण्यात गेली पण पार्श्वनाथांच्या ऐतिहासिक संभाव्यतेविषयी ऐतिहासिक दृष्टीतून त्यांनी काही लिहिले किंवा मत्स्यवाचक 'अणिमिस' या शब्दाचा दुसरा कोणताही अर्थ न करता केवळ fish येवढाच अर्थ नोंदविला (याचा जैनश्रमणांच्या आहाराशी संबंध येतो) तरी

कोणी जैन-धर्मियाने नापसंती किंवा खेद व्यक्त केला नाही येवढा त्यांचा अधिकार मानला जात होता. राष्ट्रपती-सुवर्णपदक व राष्ट्रीय-सन्मान घ्यायला देखील हे गृहस्थ अभ्यासाचा वेळ जातो म्हणून दिल्लीला गेले नाहीत.

**अधाशी वाचन व 'नेमके' लेखन :**

डेक्कन कॉलेज व भांडारकर - ग्रंथालयातली पुस्तके त्यांना कमी पडायची येवढे त्यांचे 'अधाशी' वाचन होते. लेखनात अतिशयोक्ती-न्यूनोक्ती होऊ नये म्हणून 'When in doubt, use a colourless word' (शंका असेल तर 'रंगहीन' शब्द वापरावा.) ही त्यांची भूमिका असायची उदात्तार्थपर निर्वचनांना ते टाळायचे. "Education is to educe whatever is good in man" असे भव्य, दिव्य, उन्नत, उदात्त न सांगता 'educe' 'to eat' ज्ञान म्हणजे 'बौद्धिक खाद्य' अशी त्यांची जमिनीवर पावले ठेवून लिहिण्या-बोलण्याची प्रवृत्ती होती. त्यांचा खरा तर ओढा 'भौतिकी' (Physics)चा होता. विद्वान व्यवहारात कमी पडतो हेही त्यांनी खोटे ठरवून दाखवले. कोल्हापूरजवळील आपल्या 'हसूरचम्पू' या गावी मजूर लावून शेती केली तर किती किफायतीचे ठरते हे त्यांनी मला हिशोब मांडून दाखवले होते. ते 'क्षेत्र' कसायला गेलेही होते पण 'सन्मतितीर्थ' व 'भांडारकर' या संस्थांनी प्राकृत कोशकार्यासाठी, (- त्रयस्त्रिंशत् देवलोकातून बोधिसत्त्वाला पृथ्वीवर अवतीर्ण होण्याची विनंती करावी -) तशी विनंती केली आणि सर 'भांडारकर'मध्ये दाखल झाले. राजाराम कॉलेजात विभाग प्रमुख, डेक्कन कॉलेजात भाषाशास्त्राचे प्रमुख प्राध्यापक, डेक्कन कॉलेजचे निदेशक अशी अधिकारपदे ते व्यवस्थित - दक्षतेने सांभाळत. भांडारकर संस्थेचे कार्यवाह ही जबाबदारीही 'अधिकची' म्हणून त्यांनी सहा वर्षे सांभाळली. माझ्याकडे ते पद आले मात्र आणि त्याच क्षणी रिक्शात बसून सर घरी गेले. संस्थेत शेवटपर्यंत येत राहिले, घरी काम करीत राहिले ते फक्त प्राकृत कोशाचे. माणसाला एखादी जबर शिक्षा द्यायची असेल तर त्याला एखाद्या भाषेचा कोश लिहिण्याची सक्ती करावी हे लॅटिन कोशकार स्कॅलेंजर याचे वाक्य सांगणारे घाटगे सर शेवटपर्यंत कोशच लिहीत राहिले; शिक्षा भोगत राहिले.

**"अ, अ अमृतातला" :**

जीवनाच्या अगदी अखेरीपर्यंतही व्होल्टायर फ्रेंच अकादमीच्या सभेला यायचा. एकदा अकादमीच्या सभेत तरूणाला लाजवेल अशा आवेशात व उत्साहात तो बोलला होता. फ्रेंच शब्दकोशाचे पुनर्लेखनाचे काम होते. 'अ' या (A) अक्षराने सुरू होणाऱ्या सर्व नोंदी करण्याचा पत्कर त्याने घेतला. सभेच्या अखेरीस तो म्हणाला

"अकारादी वर्णमालेच्या 'नावे' मी, सुजनहो, तुमचे आभार मानतो." त्यावेळी अध्यक्ष चॅस्टेलुक्स (Chastellux) तात्काळ म्हणाले, "आणि आम्हीही अक्षरांच्या 'नावे' तुमचे आभार मानतो' "Gentlemen, I thank you in the name of the alphabet"....." "And we thank you in the name of letters."

कोशगत पदांच्या नोंदीने 'अ-क्षर' ठरलेल्या 'अ-मृत' मुनींना "अक्षराणा-मकारोऽस्मि" या गीतावचनानेच कृतज्ञतापूर्वक अभिवंदन!

**डॉ. अ.मा. घाटगे यांच्या निवडक लेखनाची सूची :**

**Books :**

1. Introduction to Ardha-Māgadhī: Kolhapur, 1941.
2. Kahanayatigam, Kolhapur 1951.
3. Historical Linguistics and Indo-Aryan Languages, Bombay 1962.
4. Work-book in Modern Linguistics, Poona 1962.
5. Konkani of South Kanara, Bombay 1963.
6. Phonemic and Morphemic Frequencies of Hindi, Pune 1964.
7. Kuḍāḷī, Bombay, 1965.
8. Kuṇabī of Mahad, Bombay, 1966.
9. Cochin Dialect, Bombay, 1967.
10. Koṅkaṇī of Kaṇkoṇ, Bombay, 1968.
11. Marāṭhi of Kasargode, Bombay, 1969.
12. Warli of Thana, Bombay, 1969.
13. Some Aspects of applied Linguistics, Kolhapur, 1970.
14. Marathi Dialect Texts I, Pune, 1971.
15. Gawdi, Bombay, 1972.
16. Sanskrit Historical Dictionary, Specimen Fasciculy, 1973.
17. Sanskrit Dictionary on Historical Principles, Vol. I 1976-1978.
18. Sanskrit Dictionary of Historical Principles, Vol. II (1979-1981) Vol. III, Part I, 1989.

**Books Edited**

1. Winter Seminar in Linguistics, Pune, 1964.
2. Proceedings of the Seminar in Prakrit Studies, Pune 1970. (With Dr. R.N. Dandekar)
3. Studies in Transformational Grammar, Pune, 1971.
4. Studies in Historical Lexicography, 1973.
5. Bhili of Danga, 1976.

■

'यशोदीप' व, ज्ञानल मंगल कार्यालयाजवळ, सदाशिव पेट, पुणे ४११ ०३०.

# इंग्रजीची खिडकी, मराठीचे डोळे

**मॅक्सीन बर्नसन**

दुष्काळामुळे बँकेचे कर्ज फेडता आले नाही त्यामुळे शेतकरी आत्महत्या करतात, अशी बातमी आपण वरचेवर वाचतो. अशी आत्महत्या दृश्य असल्यामुळे आपण थोडा वेळ तरी हादरतो. मात्र आज महाराष्ट्रामध्ये सामुदायिक आत्महत्या चालूच आहे. ती कोणाला दिसत नसल्यामुळे आपण हादरण्याचा प्रश्नच येत नाही. ती आत्महत्या म्हणजे सांस्कृतिक आत्महत्या. मध्यमवर्गाने ती केव्हाच करायला सुरुवात केली. आता त्यांच्या पाठोपाठ बहुजन समाज या आत्महत्येमध्ये सामील होण्याची धडपड करीत आहे.

सांस्कृतिक आत्महत्या हे शब्द मी कोणत्या संदर्भात वापरते? सारासार विचार न करता, बेभान होऊन इंग्रजीच्या मागे लागणे, याला मी सांस्कृतिक आत्महत्या म्हणते. मुलांना दर्जेदार मराठी माध्यमाच्या शाळेतून काढून इंग्रजी माध्यमाच्या शाळेमध्ये घालणे, मुलांना मराठी अजून लिहिता वाचता येत नसतानाही पहिलीपासून इंग्रजीचे शिक्षण सुरू करणे, इत्यादी गोष्टींना मी सांस्कृतिक आत्महत्या म्हणते.

संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर ४२ वर्षांनी "आपल्याला नसले तरी आपल्या मुलांना उत्तम इंग्रजी यावे, त्यासाठी वाटेल ती किंमत द्यायला तयार आहोत वैयक्तिक अथवा सांस्कृतिक" इथपर्यंत मराठी जनता येऊन पोचली याचे कारण काय? याची तपशीलवार कारणमीमांसा बघायला इथे वेळ नाही (व असे विश्लेषण करण्याची माझी क्षमताही नाही) तरीही ढोबळमानाने आपण काही गोष्टी बघू शकू.

### स्वातंत्र्य व संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर

संयुक्त महाराष्ट्राची स्थापना म्हणजे लोकशाहीचा विजय; आता सामाजिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांमध्ये मराठी वापरले जाईल, व समाजाच्या सर्व थरातील माणसे एकत्र येऊन पुरोगामी, सक्षम राज्य निर्माण होईल, असे स्वप्न होते. हे स्वप्न बऱ्याच अंशी साकार झाले आहे. जिल्हा परिषद, पंचायत समितीसारख्या स्थानिक स्वराज्य संस्था निश्चितपणे सक्षम झाल्या आहेत. ग्रामीण भागामध्ये बँका,

सहकारी सोसायट्या, मार्केटिंग कमिट्या वगैरे विकसित झाल्या. शाळा कॉलेजांचे जाळे सर्वत्र पसरले. अल्पकाळामध्ये एवढी प्रगती झाली ही गोष्ट अभिमानास्पद असली तरी सर्व ठीक आहे असे आपण म्हणू शकत नाही. भ्रष्टाचाराने, आर्थिक बेशिस्तीने सहकारी बँका व साखर कारखाने पोखरलेले आहेत. शिवाय प्रगती असमतोल झाली आहे. पश्चिम व दक्षिण महाराष्ट्राला प्रगतीचा जास्त लाभ मिळाला आहे. त्या मानाने विदर्भ, मराठवाडा, कोकण या भागांना एवढा लाभ मिळाला नाही. किंबहुना प्रत्येक भागामध्ये काही विशिष्ट जाती, विशिष्ट वर्गांनी प्रगतीच्या लाभाचा मोठा अंश स्वतःकडे खेचून घेतला आहे.

शिक्षणाबद्दल बोलायचे झाले तर शाळांचे जाळे सर्वत्र पसरले तरी सर्वत्र दर्जेदार शिक्षण आपण देऊ शकलो नाही. खुद्द शिक्षणमंत्र्यांनी अलिकडे म्हटले आहे की, चौथीतील अनेक मुलांना लिहिता-वाचता येत नाही. शिवाय पहिलीमध्ये दाखल झालेल्या मुलांपैकी केवळ एक तृतीयांश मुले एस.एस.सी.ला बसतात व त्यांच्यामध्ये फक्त ५० टक्के पास होतात. याचा अर्थ की त्या वयोगटातील मुलांपैकी केवळ १७ टक्के एस.एस.सी. पास होतात. शाळेत दाखल न झालेल्या मुलांना हिशोबात धरले तर टक्केवारी १४ च होते. थोडक्यात आपल्याकडील ८६ टक्के मुले एस.एस.सी. पास ही किमान पातळी गाठू शकत नाहीत. शिवाय जी मुले एस.एस.सी. पास होऊन कॉलेजला जातात त्यांचे भवितव्य उज्ज्वल आहे असेही म्हणता येत नाही. थोडक्यात स्वातंत्र्यानंतर व संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक विकासाबाबतच्या आशा - आकांक्षा पुरेशा प्रमाणात सफल होऊ शकल्या नाहीत. अर्थात मराठीला पाठ फिरवून इंग्रजीकडे वळण्याचे हे एकमेव कारण नव्हे. कौटुंबिक, सामाजिक, राष्ट्रीय व जागतिक पातळीवर होणाऱ्या अनेक घडामोडींमुळे "इंग्रजीशिवाय आपल्याला गत्यंतर नाही" असे लोकांना वाटत आहे.

कौटुंबिक पातळीवर इंग्रजीची आवश्यकता अनेक वेळा प्रकर्षाने जाणवते. घरोघरी - विशेषतः मध्यमवर्गीय कुटुंबामध्ये - नातेवाईक अमेरिकेला जाऊन राहिलेले असतात. वरचेवर ते स्मार्ट पोषाख घालून भेटायला येतात व ते आणि त्यांची मुले फाडफाड इंग्रजी बोलतात. त्यावेळी त्यांच्या देशी बांधवांना वैषम्य वाटते. त्यांच्यासारखे आपण इंग्रजी बोलू शकत नाही, आपण किती बावळट, वगैरे. (त्या परदेशस्थ नातेवाईकांनाही वैषम्य वाटत असेल की आपल्या मुलांना मराठी येत नाही, पण ही गोष्ट इकडच्या लोकांच्या लक्षात येत नाही.)

केवळ परदेशात स्थायिक झालेल्या नातेवाईकांकडून दडपण येते असे नाही. त्याशिवाय इथे राहणाऱ्या ज्या नातेवाईकांची किंवा शेजाऱ्यांची मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळेत शिकतात त्यांचेही खूप दडपण लोकांवर पडते. आपली मुले त्यांच्या मुलांसारखी स्मार्ट दिसत नाहीत, इंग्रजी संभाषण त्यांना करता येत नाही, साध्या इंग्रजी मॅनर्स येत नाहीत या गोष्टीबद्दल आयांना विशेष वाईट वाटते. एकूण इंग्रजी भाषा, पाश्चात्य पोषाख व शिष्टाचार यांचे एकप्रकारचे भुरळ पाडणारे वलय असते.

इंग्रजी माध्यमाच्या शाळेत प्रवेश घेणे हा, या नव्या जगामध्ये जाण्यासाठीचा पासपोर्ट समजला जातो यात काही नवल नाही. आपल्या खेड्यातील कॉन्व्हेंट शाळेचे वर्णन करीत असताना त्या शाळेचे आकर्षण जेन साही यांनी स्पष्ट केले आहे. (ही विशिष्ट शाळा कानडी माध्यमाची असली तरी साहींनी केलेल्या वर्णनामध्ये इंग्रजी माध्यमांच्या शाळांचे मंत्रबद्ध वातावरण स्पष्ट दिसून येते.) ज्ञात जगापासून स्वाभिमान व स्वतःची दिशा ठरवण्याचे स्वातंत्र्य देऊ करणाऱ्या दुसऱ्या संस्कृतीमध्ये व राहणीमध्ये शिरण्यासाठी कॉन्व्हेंट शाळा हा पहिला टप्पा म्हणून ओळखला जातो. कॉन्व्हेंट शाळा हा केवळ शहराशी दुवा नसून इंग्रजी बोलणाऱ्या संगणक-साक्षर असलेल्या व नाना प्रकारच्या संधी देऊ करणाऱ्या पाश्चात्त्य देशांशी दुवा असतो. कॉन्व्हेंट शाळेने देऊ केलेल्या निवडस्वातंत्र्याचे महत्त्व कमी लेखता कामा नये.

साही म्हणतात त्याप्रमाणे बहुसंख्य मुलांना ते पाश्चात्त्य जग मृगजळ ठरणार आहे. मात्र साही आपल्याला याचीही आठवण करून देतात की पाश्चात्त्य जग आपलेसे करण्याची इच्छा केवळ बालिश कल्पनाविलास अथवा न्यूनगंडाने निर्माण झालेली नसून लोकांच्या व त्यांच्या मुलांच्या भवितव्याबाबतच्या रास्त काळजीतून निर्माण झालेली आहे. निरनिराळ्या क्षेत्रांमध्ये वैज्ञानिक व तंत्रविषयक क्रांती कमालीच्या वेगाने चाललेली आहे. या क्रांतीचा तपशील लोकांना समजत नसणार पण २५-३० वर्षानंतरचे जग फार वेगळे असणार आहे व आपल्या मुलांना त्यात स्थान मिळवण्यासाठी इंग्रजीचे ज्ञान आवश्यक आहे, एवढी जाणीव त्यांना आहे.

वास्तविक, जवळचा भविष्यकाळ २०३० पर्यंत म्हणा - किती वेगळा असेल याची फार थोड्या लोकांना कल्पना असेल. बहुसंख्य लोकांना ही कल्पना असती तर त्यांची काळजी किती तरी पटींनी वाढली असती. अलिकडे प्रसिद्ध व्यवस्थापन सल्लागार पीटर ड्रकर यांनी "The Next Society - a Servey of the Near

Future" ("पुढचा समाज - जवळच्या भविष्यकाळाचे सर्वेक्षण") या प्रदीर्घ लेखामध्ये निर्माण होत असलेल्या नवीन समाजाचे वर्णन केले आहे. या समाजाला 'ज्ञानाचा समाज' असे त्यांनी म्हटले. त्यांनी केलेले वर्णन ऐकण्यासारखे आहे.

पुढचा समाज हा ज्ञानाचा समाज होईल. ज्ञान ही प्रमुख संपत्ती असेल व काम करणाऱ्या वर्गामध्ये ज्ञानाच्या कर्मचाऱ्यांचे वर्चस्व राहील. या समाजाची तीन प्रमुख वैशिष्ट्ये असतील.

* भौगोलिक सीमा नसणे (borderlessness) कारण पैशापेक्षाही ज्ञान सहज सर्वत्र पसरते.

* सगळ्यांना उपलब्ध असलेल्या औपचारिक शिक्षणाच्या माध्यमातून स्वतःचा सामाजिक स्तर उंचावण्याची संधी (upward mobility).

* यशाबरोबर अपयश येण्याची शक्यता. सगळ्यांना 'उत्पादनाचे साधन' (म्हणजे ज्ञान) मिळू शकेल पण सगळ्यांना जिंकता येणार नाही.

* या तीन वैशिष्ट्यांमुळे ज्ञानाचा समाज हा व्यक्तींसाठी व संघटनांसाठी अत्यंत स्पर्धात्मक समाज असणार आहे.

हा नवा समाज, ड्रकर म्हणतात, मोठ्या प्रमाणावर ज्ञानाच्या कर्मचाऱ्यांवर अवलंबून असणार. हे कर्मचारी दोन प्रकारचे असतील.

१) विद्वान डॉक्टर, वकील, शिक्षक, लेखापाल, केमिकल इंजिनियर

२) ज्यांना ड्रकर माहिती तंत्रज्ञ म्हणतात ते संगणक तंत्रज्ञ, सॉफ्टवेअर डिझायनरस्, वैद्यकीय क्षेत्रातील तंत्रज्ञ, वस्तुनिर्माण तंत्रज्ञ, कायद्याअनुपूरक क्षेत्रातील लोक. (कायद्याच्या क्षेत्रामध्ये काम करणारी पदवी नसलेली मंडळी).

पाश्चात्त्य देशांमध्येसुद्धा या नवीन समाजाच्या येण्याने प्रचंड उलथापालथ होणार आहे. अशिक्षित, अप्रशिक्षितांना स्थान राहणार नाही. सुशिक्षित, प्रशिक्षितांना देखील नोकरी टिकण्याची शाश्वती राहणार नाही. काही विकसित देशांमध्ये (विशेषतः युरोपमध्ये) जिथे लोकसंख्या घटत आहे आणि वृद्धांची संख्या जास्त आहे तिथे कनिष्ठ सफाई कामासाठी व इतर कनिष्ठ नोकरीसाठी विकसनशील देशातून कर्मचाऱ्यांना मोठ्या प्रमाणावर आणले जाते. मजुरांची ही आयात वाढत जाणार व एक स्फोटक सामाजिक परिस्थिती निर्माण होण्याचा संभव आहे.

नवीन समाजाच्या उदयाने पाश्चात्त्य देशांमध्ये धोकादायक परिस्थिती होणार असेल तर भारतासारख्या विकसनशील देशाचे काय होणार?

मी मघाशी सांगितले होते की महाराष्ट्रामध्ये ८६ टक्के मुले एस.एस.सी. पास होऊ शकत नाही. उरलेल्या १४ टक्क्यांपैकीसुद्धा कितीजण या नवीन समाजामध्ये तग धरू शकतील? हा प्रश्न डोळ्यासमोर ठेवून आपल्याला भाषिक व्यवहाराचे व शैक्षणिक नियोजन करायला पाहिजे.

**इंग्रजी कशासाठी?**

नमनालाच घडाभर तेल जाळून मी कदाचित तुमचा अंत पाहिला असेल. मात्र गेल्या ४०-५० वर्षांचा इतिहास व येत्या ३०-४० वर्षांचा भविष्यकाळ दोन्हीची पार्श्वभूमी विचारात घेतल्याशिवाय इंग्रजीच्या अध्यापनाचा विचार करता येत नाही. आतापर्यंत आपण पाहिले की स्वातंत्र्यप्राप्ती किंवा संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेमुळे निर्माण झालेल्या आशा-आकांक्षा पूर्णपणे सफल झालेल्या नाहीत व नवीन संधीसाठी व आर्थिक सुरक्षिततेसाठी पाश्चात्य देशांकडे व इंग्रजांकडे लोक बघत आहेत. मात्र ज्या पाश्चात्य देशांकडे आपले लोक बघत आहेत त्यांच्यातही नवीन ज्ञानाचा समाज उदयास येत असल्यामुळे बेकारी खूप वाढणार आहे आणि तेथेही सामाजिक उलथापालथ होण्याचा संभव आहे.

या परिस्थितीमध्ये जेव्हा आपण म्हणतो की "इंग्रजीशिवाय गत्यंतर नाही" त्यावेळी आपल्याला काय म्हणायचे आहे? कशासाठी आपल्याला इंग्रजी पाहिजे? या प्रश्नाला उत्तर देण्यासाठी आपल्याला आपला एकूण भाषा व्यवहार बघायला पाहिजे. म्हणजे आपल्या समाजामध्ये मराठी, हिंदी व इंग्रजी या तीनही भाषांचे स्थान काय आहे, याचा विचार केला पाहिजे. त्रिभाषा सूत्र हे नवीन नाही, पण कदाचित त्याकडे नव्याने बघण्याची आवश्यकता आहे. हे बघत असताना एक तत्त्व डोळ्यासमोर ठेवायला पाहिजे ते म्हणजे 'Communication creates community' म्हणजे भाषिक देवाणघेवाणीने, संज्ञापनाने समाज निर्माण होतो.

**मराठी**

स्थानिक पातळीवर व राज्यपातळीवर बहुतांश व्यवहार मराठीमध्ये होणे इष्ट आहे. मात्र याबाबत दुराग्रह किंवा इतर भाषांचा द्वेष होता कामा नये. म्हणून लोकांना सामाजिक प्रवाहामध्ये आणण्याचे साधन म्हणून भाषेकडे बघावे, त्यांना वंचित ठेवायचे साधन म्हणून नव्हे. शालेय पातळीवर मराठी माध्यमाच्या शाळा सक्षम करण्याची गरज आहे व मराठी माध्यमातून व्यवसाय शिक्षण जास्त मोठ्या प्रमाणावर उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. कॉलेज व विद्यापीठ स्तरावर विद्यार्थ्यांचे बहुभाषिक प्रभुत्त्व निर्माण करण्याचा प्रयत्न व्हावा.

## हिंदी

महाराष्ट्राचे भाग्य आहे की येथील बहुसंख्य लोक मोडकेतोडके का होईना हिंदी बोलू शकतात. आपल्याकडे वेगवेगळे भाषक लोक एकत्र आले की ते सहज हिंदीमध्ये बोलतात. बहुतेक लोकांची ती मातृभाषा नसल्यामुळे कोणाला संकोच वाटत नाही. हिंदी सिनेमाच्या लोकप्रियतेबद्दल तर बोलायलाच नको!

## इंग्रजी

आता मघाशी विचारलेला प्रश्न पुन्हा विचारू या : आपल्याला इंग्रजी कशासाठी पाहिजे? शिष्टाचारांसाठी, संभाषण करण्यासाठी? करमणुकीसाठी, पत्रव्यवहारासाठी? तांत्रिक माहितीच्या देवाणघेवाणीसाठी? ग्रंथ व इंटरनेटच्या माध्यमाने ज्ञान मिळवण्यासाठी अथवा देण्यासाठी? आंतरराष्ट्रीय व्यवहार करण्यासाठी? साहित्याच्या आस्वाद व निर्मितीसाठी? वैचारिक देवाणघेवाणीसाठी? ही यादी अर्थात पूर्ण नाही. पण ती प्रातिनिधिक आहे. या यादीवरून असे स्पष्ट होते की वैयक्तिक गाठीभेटीपासून, व्यवहार उद्योग, तंत्रज्ञान, विज्ञान, तत्त्वज्ञान, साहित्य अशा अनेक क्षेत्रांमध्ये आपल्याला इंग्रजीचा वापर करावयाचा आहे. या सर्व उद्दिष्टांसाठी इंग्रजीचा वापर करण्याची तयारी शालेय व महाविद्यालयीन शिक्षणामध्ये व्हायला पाहिजे, अशी आपली अपेक्षा असते. ज्यांना संभाषण कौशल्ये म्हणतात ती म्हणजे श्रवण, भाषण, वाचन, लेखन - ही चारही कौशल्ये शाळा कॉलेजमध्ये प्रत्येक विद्यार्थ्याला शिकवायला पाहिजे असे आपण गृहीत धरतो. असे करणे शक्य आहे का? तर नाही. मग कोणत्या गोष्टींना प्राधान्य द्यायला पाहिजे?

प्रत्येक विद्यार्थ्याला हे सर्व देणे शक्य नाहीच, हे आपल्याला कबूल करावे लागेल. पाचवीपासून पदवीपर्यंत आपण जवळ जवळ तेच इंग्रजी शिकवतो. तृतीय वर्षांतील सोडाच पण विशेष स्तरावर इंग्रजी घेतलेले एम्.ए. उमेदवारसुद्धा अनेकदा दोनचार बिनचूक इंग्रजी वाक्ये लिहू शकत नाहीत याचे कारण काय?

सुरुवातीला आपण मान्य केले पाहिजे की इंग्रजीसारखी परकीय भाषा शिकवण्याची अनुकूल स्थिती बहुसंख्य शाळा-कॉलेजमध्ये नसते. एक तर शाळा-कॉलेजच्या बाहेर मुलांच्या कानावर इंग्रजी पडत नाही. त्यामुळे विद्यार्थ्यांच्या कानावर वर्गात जेवढे इंग्रजी पडते, तेवढेच त्यांना मिळते. तास ४५ मिनिटांचा असतो. किंबहुना बहुतेक वेळा शिक्षकांचे इंग्रजी अत्यंत कच्चे असते. अशा परिस्थितीमध्ये काहीतरी साधायचे असेल तर आपल्याला अतिशय डोळसपणे

विचार आणि नियोजन करायला पाहिजे. डोळसपणे विचार करायचा असेल तर काही गोष्टी गृहीत धरायला पाहिजेत.

१. संभाषण कौशल्य हे इंग्रजी आकर्षणाचे महत्त्वाचे अंग असले तरी त्याला विशेष प्राधान्य देण्याची गरज नाही. इंग्रजी बोलणाऱ्या लोकांमध्ये माणूस पडला तर तो नैसर्गिक रीतीने संभाषण करायला शिकतो. (पूर्वी अशिक्षित कानडी बायका लग्न करून महाराष्ट्रामध्ये स्थायिक व्हायच्या. काही वर्षांनंतर या अस्खलित मराठी बोलायच्या.) अर्थात संभाषण कौशल्य शाळेमध्ये विकसित नाही केले तरी जुजबी शिष्टाचार शिकवणे शक्य आहे व ते करावे.

२. "English is a window to the world." हे वाक्य जवाहरलाल नेहरूंच्या काळी कोणीतरी म्हटले होते. ते अजूनही खरे आहे. म्हणजे इंग्रजी हे ज्ञान व तंत्रज्ञान मिळवण्याचे व देण्याचे साधन आहे.

३. संभाषण कौशल्य व श्रवण / भाषण यात फरक आहे. बातम्या ऐकणे, व्याख्यान समजणे, व्याख्यान देणे यांसारख्या गोष्टी महत्त्वाच्या असतात व शाळा कॉलेजमध्ये ही कौशल्ये विकसित होऊ शकतात.

**अभ्यासक्रम व अध्यापनपद्धती : वैचारिक मरगळ**

काही दिवसांपूर्वी एका वरिष्ठ अधिकाऱ्याला कोणीतरी शालेय इंग्रजी अभ्यासक्रमाचा scope and sequence (आवाका व पाठ्यक्रम) काय असे विचारले. त्या अधिकाऱ्यांनी काय उत्तर दिले? "छे, छे अलिकडे तसे नसते. चार कौशल्ये आहेत श्रवण, भाषण, वाचन, लेखन. अशा अविचारी वृत्तीमुळे आपली इंग्रजीची पाठ्यपुस्तके दिशाहीन व नीरस असतात."

वास्तविक, पाठ्यपुस्तकांच्या बाबत म्हणा किंवा इतर विषयांबाबत म्हणा- आपल्या संपूर्ण शिक्षण क्षेत्रात कमालीचे वैचारिक दारिद्र्य दिसते. पाठ्यपुस्तक मंडळाचे संपूर्ण नाव "महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व संशोधन मंडळ" असे आहे. पण सध्या तिथे काही संशोधन केले जात आहे का? काही वर्षांपूर्वी तेथील एका अधिकाऱ्याला प्राथमिक स्तरावरील मराठी वाचन अध्यापना - बद्दल संशोधन करायचे होते. मग दोनतीन वर्षांनंतर मी त्याबद्दल त्यांना विचारले तेव्हा त्यांनी सांगितले की "तुम्हा खाजगी क्षेत्रातील लोकांचे वेगळे पडते. आम्हांला काही करता येत नाही. आदेश वरून येईल त्याप्रमाणे करायचे." हीच वृत्ती पहिलीपासून इंग्रजी व अलिकडे प्राथमिक शालेय प्रमाणपत्र परीक्षेबद्दल दिसून आली. शिक्षक असो अथवा अधिकारी असो, अनेक माणसांनी खाजगीत विरोध व्यक्त केला पण

जाहीर रीतीने ते बोलायला धजत नव्हते.

इंग्रजीच्या अध्यापनाबाबत ही मनोवृत्ती विशेष प्रकर्षाने दिसून येते कारण इथे दडपण केवळ शासनाचे नव्हे तर ब्रिटिश कौन्सिल सारख्या संस्थेचे आहे. गेल्या साधारण ४० वर्षांपासून द्वितीय किंवा तृतीय भाषा म्हणून इंग्रजी कसे शिकवायचे याचे मार्गदर्शन ब्रिटिश कौन्सिलचे तज्ज्ञ आपल्याला देत असतात. त्यांनी घालून दिलेली तत्त्वे जणू काय ब्रह्मवाक्ये आहेत, असे पाहिले जाते. अर्थात मातृभाषेचा वापर करू नये असे त्यांचे एक मूलभूत तत्त्व असते. "ब्रिटिश कौन्सिल" असे म्हणणे हे स्वाभाविक आहे. पाठातील शब्दांचा अर्थ मराठी, हिंदी, कानडीमध्ये द्यायचा असेल तर त्यांच्या तज्ज्ञांची स्थिती काय असणार? भाषांतराबाबत तीच परिस्थिती, वास्तविक, अमेरिकेमध्ये आपण परकीय भाषांची पाठ्यपुस्तके पाहिली तर लक्षात येते की शब्दार्थ मातृभाषेत (म्हणजे इंग्रजीत) दिलेला असतो. शिवाय भाषांतराचा सरावही (नवीन भाषा ते इंग्रजी, इंग्रजी ते नवीन भाषा) समाविष्ट असतो. असे असताना आपण मातृभाषेचा वापर व भाषांतर इतक्या कटाक्षाने का टाळतो, हे समजत नाही.

**व्याकरण** - भाषा अध्यापनाच्या बाबतीत - विशेषतः व्याकरणाच्या बाबतीत - नेहमी टोकाची भूमिका घेतली जाते. काही वर्षांपूर्वी वाक्यरचनेवर आधारित संरचनाधिष्ठित 'structural method' सर्रास वापरली जात होती. त्यात काही उणिवा होत्या तरी ती अत्यंत उपयुक्त होती. त्यातला चांगला भाग न घेता ती पद्धत पूर्णपणे बाजूला सरकवली गेली व अलिकडे पद्धतशीर व्याकरण शिकवले जात नाही. इतर देशांमध्ये परकीय भाषा शिकवण्यासाठी पद्धतशीर व्याकरण शिकवतात त्याप्रमाणे हे आपण का करीत नाही, हे अनाकलनीय आहे.

**पाठ्यपुस्तकांचा आशय** - गेल्या काही वर्षांपासून मी शालेय पातळीवरच्या इंग्रजीची पाठ्यपुस्तके अभ्यासली आहेत. ती शिकवता येत नाहीत म्हणून माझ्या सहकाऱ्यांनी व मी इयत्ता पाचवी ते आठवी ही पुस्तके न वापरता पर्यायी साहित्य वापरण्याचे ठरवले. 'सक्तीचे इंग्रजी' या विषयावरची यंदा मला पुणे व शिवाजी विद्यापीठांची पुस्तके पहायला मिळाली. शिवाजी विद्यापीठाची पुस्तके बरीच विचारपूर्वक तयार केली आहेत, असे वाटते. मात्र प्रत्येक वर्षी communication skills' म्हणून जो भाग आहे तो कसा शिकवायचा मलाही प्रश्न पडेल. हेतू योग्य आहे, पण तो व्यवस्थितपणे सफल झाला आहे, असे वाटत नाही.

शिवाजी विद्यापीठाच्या पुस्तकांमध्ये reading comprehension चा भाग

चांगला आहे. कवितेची निवड मला विशेष आवडली मात्र एका वर्षासाठी सगळ्या उताऱ्यांना जुळणारा एक समान विषय घेतला असता तर एखाद्या वेळेस ती पुस्तके जास्त प्रभावी ठरली असती.

**पाहिजे : नवी दृष्टी, नवं चैतन्य**

मी अत्यंत व्यापक प्रश्नांपासून अगदी बारीक तपशीलाकडे उडी घेतली, असे मला स्वतःला वाटते. तर आता केलेल्या विवेचनाचा सारांश मी सांगण्याचा प्रयत्न करते. पहिली गोष्ट, महाराष्ट्रामध्ये न्यायी, सक्षम, सर्वांना सामावून घेणारा समाज आपल्याला निर्माण करायचा असेल तर मराठीकडे पाठ फिरवून चालणार नाही त्यासाठी मराठी माध्यमाचे शिक्षण जास्त दर्जेदार करायला पाहिजे. दुसरी गोष्ट, आपल्याकडे हिंदीचे महत्त्वाचे स्थान मान्य केले पाहिजे. तिसरी गोष्ट म्हणजे, इंग्रजी संभाषण कौशल्याची अवास्तव चिंता न करता इंग्रजीकडे प्रामुख्याने ज्ञानाची भाषा व आंतरराष्ट्रीय व्यवहार व संवादाची भाषा म्हणून बघावे. या दृष्टीने त्याचे अध्यापन करण्यासाठी आपण अनेक प्रयोग करू शकू.

आव्हान मोठे आहे, विषयही मोठा आहे, पण मराठीभाषा मराठी समाज टिकवायचा असेल तर, इंग्रजीचे अर्थपूर्ण शिक्षण देणे गरजेचे आहे. नाही तर पाश्चात्त्य देशांकडे जाण्यासाठी महाराष्ट्र केवळ प्रतीक्षा कक्ष म्हणून राहणार आहे. मराठी अभ्यास परिषदेसाठी डॉ. अशोक केळकर यांनी एक घोषवाक्य तयार केले ते असे, "इंग्रजीची खिडकी मराठीचे डोळे" हे वाक्य ध्यानात ठेवून आपण कामाला लागले पाहिजे.

■

**ट.पे.क्र. ४०, फलटण, (जि. सातारा) ४१५ ५२३.**

**भाषावार्ता**

मराठीच्या विविध बोलींच्या साहित्याचा अभ्यास व्हावा. बोलींना समाज मान्यता मिळावी म्हणून समविचारी लोकांनी मराठी बोली साहित्य महामंडळाची स्थापना केली असून अध्यक्ष - डॉ. हरिश्चंद्र बोरकर तर उपाध्यक्ष डॉ. प्रतिमा इंगोले, दर्यापूर आणि डॉ. किसन पाटील, जळगाव आहेत. सचिव आहेत हिरामन लांजे आणि सहसचिव डॉ. बाळकृष्ण लळित, शिरूर व डॉ. रमेश सूर्यवंशी, कन्नड हे आहेत. कोषाध्यक्ष पदी राजन जायस्वाल चारोळीकर, नागभिड यांची निवड झाली आहे. या महामंडळाचे महाराष्ट्रातील विविध जिल्ह्यातील एकूण १४ सदस्य आहेत.
कार्यालयाचा पत्ता - हिरामन लांजे, ४०४ स्वप्नील शेवलीनी अपार्टमेंट, उत्तर अंबाझरी मार्ग, नागपूर. दू.क्र. ०७१२-२४८७४९



अनुक्रमणिका

# समर्थ रामदासांच्या काही ओळींचे भाषांतर करताना

अंशुमती अ. दुनाखे

समर्थ रामदासांचे चरित्र डॉ. स. म. परळीकर हिंदीमध्ये लिहीत होते. त्या पुस्तकात शेवटी परिशिष्टामध्ये समर्थांच्या काव्याचा नमुना म्हणून काही ओळी द्याव्यात असा विचार त्यांनी केला. त्यांनी व श्री. सुनील चिंचोळकरांनी त्यांच्या वेगवेगळ्या रचनांमधून जवळजवळ हजार एक ओळी निवडल्या होत्या. त्या ओळींचे हिंदीमध्ये भाषांतर करावयाचे होते. हे काम त्यांनी माझ्यावर सोपवले होते.

समर्थांचे वाङ्मयीन रूप म्हणजे 'दासबोध', निवडलेल्या ओळीत सर्वात अधिक ओळी दासबोधातील असणे क्रमप्राप्तच होते. मूर्ख व पढतमूर्खाची लक्षणे, दिनचर्या, भक्तीची शक्ती, आत्मज्ञान, मृत्यूचा महिमा, प्रपंच आणि परमार्थ, राजनीती, भिक्षेचे महत्त्व, सामाजिक शिकवण आदी विविध विषयांवरील ओव्या निवडल्या होत्या. समर्थांचे 'मनाचे श्लोक' ही महत्त्वाचे. त्यातील काही श्लोक वानगीदाखल निवडले होते. करुणाष्टके, आरत्या, स्फुटप्रकरणे, सवाया, चौपदी आदी वेगवेगळ्या काव्यप्रकारांच्या रचना त्यांनी मोठ्या साक्षेपाने निवडल्या होत्या.

ओवी हा छंद तसा लवचिक आहे. स्वतः रामदासांनी स्वतःवर अक्षरसंख्येचे बंधन घालून घेतलेले नाही. त्यामुळे एकापरीने ओवीचा अनुवाद ओवीत करणे सापेक्षतः सोपे होते. याबद्दल काही विद्वानांनी असे मत प्रदर्शित केले की उत्तरेत 'दोहा' विशेष प्रचारात आहे. तेव्हा ओवीचा अनुवाद दोह्यात करायला हवा होता. मला स्वतःला असे वाटते की समर्थांच्या कृतीचा 'फील' येण्याच्या दृष्टीने, अनुभव घेण्याच्या दृष्टीने ओवी छंदातच अनुवाद करणे उचित होईल. समर्थांचे विचार दोह्यात मांडणे हा विषय वेगळा व दासबोधातील ओव्यांचा अनुवाद दोह्यात करणे वेगळे.

मनाचे श्लोक 'भुजंगप्रयात' वृत्तात आहेत. यात चार य गण (यमाचा) असतात. म्हणजे ओळीत बारा शब्द व त्यातील पहिला, चौथा, सातवा व दहावा हे ऱ्हस्व हवेत व बाकीचे सर्व दीर्घ हवेत. शिवाय यमकाचेही भान ठेवायला हवे. अर्थातच अर्थाला धक्का लागता कामा नये, हे नित्य ध्यानात ठेवायलाच हवे.

ओवीसारखी लवचिकता यात नाही.

"गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा" या ओळीचे भाषांतर 'गणाधीश जो ईश सारे गुणों का' हे भुजंगप्रयाताच्या अटीत बसू शकले पण 'नको रे मना लोभ हा अंगिकारू । नको रे मना मत्सरू, दंभ मारू' या ओळीत 'मना' संबोधन हिंदीत 'मन' असे होणार, 'अंगिकार', 'मत्सरू'चा अनुवाद करताना 'भुजंगप्रयात' संभाळणे कठीण. मग 'करो ना कभी लोभ स्वीकार तुम । रहो दूर दंभ मत्सर से सदा तुम ।' असा अनुवाद केला. अर्थ तोच राखला व साधारण लय तीच ठेवली.

करुणाष्टकातही बऱ्याच ठिकाणी हाच विचार केलेला आहे. तरीही त्यातील आर्तता पूर्णपणे पोचवू शकले नाही ही खंत राहते.

*अनुदिन अनुतापें तापलो रामराया ।*
*परमदिनदयाळा नीरसीं मोहमाया ॥*
*अचपळ मन माझे नावरे आवरीतां ।*
*तुजविण शिण होतो धांव रे धांव आता ॥*

भाषांतर असे केले -

*अनुदिन अनुताप से तप्त मैं रामराया*
*परम दीनदयालु दूर करो मोहमाया ।*
*बहुत चपल मन मेरा वश में न आता ।*
*तुम बिन श्रम होते दौड़ते पास आना ॥*

'धाव रे धाव'ची आर्तता 'दौड़ते पास आना' मध्ये येऊ शकली नाही. चौपदीतही शक्यतो शब्दमर्यादा व लय तीच ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

मधुर वाणी दो हे राम । विमल कटनीं दो हे राम ॥
प्रसंग जानूँ मैं हे राम । दूरदृष्टि मुझे दो हे राम ॥

वास्तविक 'रामजी' भाषांतर करावे असे हिंदी पद्धतीप्रमाणे वाटत होते पण 'दे रे राम' मधली जवळीक, विश्वास पोचवण्यासाठी 'दो हे राम'चा प्रयोग केला. जी मंडळी रोज चौपदींचे पठण करतात त्यांनी ग्वाही दिली की आम्ही ज्या चालीवर मराठी म्हणतो त्याच चालीवर हिंदी म्हणून पाहिले व आम्हांला छान वाटले.

स्फुट प्रकरणात बऱ्याच ठिकाणी ओवी छंद आहे. तिथे ओवी छंदाचाच वापर केला आहे. आरत्यांच्या बाबतीत महाराष्ट्रात त्या त्या आरतीची जी चाल आहे त्या चालीवर म्हणता येईल अशा प्रकारे अनुवाद करण्याचा प्रयत्न केला आहे.

एकूण भाषांतर करताना महत्त्व अर्थांतराला, लयीला व 'फील'ला दिले आहे.

ओवी छंद लवचिक असला तरी समर्थांच्या खास शब्दांचा अनुवाद करण्याची समस्या होतीच.

*श्रोते पुसती कोण ग्रंथ । काय बोलिलें जी येथ*
*श्रवण केलियाने लाभ । काय आहे?*

याचा अनुवाद करणे सोपे आहे. शब्द कठीण नाहीत. संकल्पना वेगळ्या नाहीत.

*श्रोता पूछते हैं कैसा ग्रंथ । क्या है इसमें प्रतिपादित*
*श्रवण करने से लाभ । क्या होगा?*

परंतु 'पढतमूर्खाची लक्षणे' सांगताना 'पढ़तमूर्ख' ही संकल्पना नवी आहे. शिकला सवरलेला असला, लिहिता-वाचता येणारा असला तरी मूर्खपणे वागणारा. शिवाय आपण शिकलेले आहोत या गुर्मीत आणखीनच मूर्खासारखा वागणारा तो 'पढतमूर्ख' याचा अनुवाद कसा करणार? 'पढ़ालिखा फिर भी मूर्ख' असे लिहूनही संकल्पना पूर्णतया उतरत नाही. शिवाय ओवीच्या ओळीत येवढे शब्द बसणेही कठीण. शेवटी टीपेत अर्थ विस्ताराने सांगून 'पढतमूर्ख' शब्द तसाच ठेवण्याचे ठरविले.

असा दुसरा शब्द म्हणजे 'करंटा'. करंटा म्हणजे दुर्दैवी, अभागा, हीनदीन, कमनशिबी. पण समर्थ 'करंटा' शब्द एखाद्या शिवीप्रमाणे वापरतात. देवाने हातपाय वगैरे सर्व दिलेले असूनही त्यांचा योग्य उपयोग करावयाचा नाही व दीनवाणेपणे दुसऱ्याच्या भाग्याकडे पाहणारा, ते भाग्य हवेसे वाटणारा पण न हालणारा म्हणून 'करंटा' राहणारा. हा भाव ही त्याच्यात आहे.

*प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला*
*मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा? (दा.बो. १२.१.३)*
*बहुत तपाचा सांठा । तेणें लाधला परीस मोठा*
*परी तो ठाईंचा करंटा । भोगूंच नेणें ॥ (३.१०.३५)*
*सद्गुरुहून देव मोठा । जयास वाटे तो करंटा*
*सुटला वैभवाचा फांटा । सामर्थ्य पिसें ॥ (५.३.४०)*

त्यामुळे त्याचा 'अभागा' किंवा 'हतभागी' हा अनुवाद अपुरा वाटतो.

असा तिसरा शब्द म्हणजे 'साक्षेप'. आज 'साक्षेपाने' म्हणजे 'विचारपूर्वक' अशा अर्थाने शब्द वापरला जातो. समर्थांनी तो 'उद्योग', 'प्रयत्न', 'खटपट' अशा अर्थाने वापरला आहे.

*साक्षेप करितां कष्टती । परंतु पुढे सुखाडिती ।*
*खाती जेविती सुखी होती । यत्नें करूनी ॥ (११.३.११)*

समर्थ रामदासांना 'आळसाचा' अत्यंत राग आहे, तिटकारा आहे -

*आळस उदास नागवणा । आळस प्रेत्न बुडवणा*
*आळसें करंटपणाच्या खुणा । प्रगट होती ॥ (११.३.१२)*

यातील 'नागवणा' शब्दही अनुवादाला कठीण आहे. 'सर्व कांही लुटून नेणारा, तुम्हांला नागवें करणारा हा आळस आहे. हा भाव त्यांनी एका 'नागवणा' शब्दाने व्यक्त केला आहे. समर्थ 'दीर्घसूचना' दूरदृष्टीच्या अर्थाने वापरतात तिथे मराठी 'सूचना' ही नाही व 'हिंदी सूचना' (माहिती) ही नाही.

*म्हणोन असावी दीर्घसूचना । अखंड करावी चाळणा*
*पुढील होणार अनुमाना । आणून सोडावें ॥ (१२.१.१२)*

'चाळणा' हा शब्दही 'वारंवार विचार करणे' या अर्थाने समर्थ वापरतात.

'नेटका' आणि 'सांकडें' हे शब्द ही अनुवादाच्या दृष्टीने विचार करण्यासारखे. 'नेटका'मध्ये चांगली मांडणी, नेमकेपणा, निश्चितपणा, व्यवस्थितपणा अशा अनेक छटा येतात. म्हणून 'प्रपंच करावा नेटका'चे भाषांतर करणे अवघड जाते. कारण यात एक 'अलिप्तपणाचा' गंधही त्या 'नेटका' शब्दाला येतो, तो भाषांतरित करता येत नाही.

भक्ताचे 'सांकडें' देवाला पडते. भक्त देवाला 'सांकडें' घालतो. या 'सांकडें'मध्ये विनंती आहे. प्रार्थना आहे, चिंता आहे, 'तळमळ आहे व देवाला एक तऱ्हेचे आव्हानही आहे. हा सर्व भाव 'संकट' 'चिंता' या शब्दाने व्यक्त होणारा नाही.

कसे लिहावे हे सांगताना समर्थ म्हणतात -

*वाटोळें सरळें मोकळें । वोतलें मसीचें काळें*
*कुळकुळीत ओळी चालल्या ढाळे । मुक्तमाळा जैशा ॥ (१९/१/२)*

यातील 'सरळे' 'मोकळे' यांचा अनुवाद करणे कठीण. मी 'सीधे' 'अंतर रखकर' असे भाषांतर केले आहे. पण समर्थांचा भाव पूर्ण आला नाही. त्यात 'वाटोळे' मध्ये 'वळणदार' हा अर्थ आहे. तो अर्थ 'गोल', 'घुमावदार' मध्ये नाही. 'वोतले' मध्ये ओतकाम केलेले कसे ठसठशीत दिसते तो भाव आहे.

काही द्विरूक्त शब्दांचा प्रयोग ही समर्थांनी फार विचारपूर्वक केला आहे.

*वेडें संसार सांडून गेलें । तरी तें कष्टकष्टोंचि मेलें ।*

*दोहीकडें अंतरलें । इहलोक परत्रीं ॥ (१४.७.२०)*

*रागेंरागें निघोन गेला । तरी तो भांडभांडोंचि मेला ।*

*बहुत लोक कष्टी केला । आपणही कष्टी ॥ (१४.७.२१)*

यात 'कष्टकष्टोंचि' व 'भांडभांडोंचि' मध्ये अपार कष्ट, असंख्य भांडणें व त्यांचे वैयर्थ व्यक्त केले आहे.

'तुजविण शिण होतो । धांव रे धाव आता' (करु.) या द्विरूक्तीत आर्तता आहे, असहायता आहे. हा आर्त धावा 'दौड़ना' शब्दाने व्यक्त होत नाही.

काही ठिकाणी समर्थांच्या रचनेत जी ऐट आहे ती दुसऱ्या भाषेत आणणे फार फार कठीण वाटते.

*आम्ही काय कुणाचे खातो रे ।*

*तो राम आम्हांला देतो रे ॥*

या त्यांच्या पदात भक्ताची 'मिजास' आहे; निर्भयता आहे.

*हम किसीका न कुछ खाते हैं*

*वे रामजी हमें सब देते हैं ।*

असा अनुवाद मी केला आहे, पण तो पातळ वाटतो. प्रश्न करण्यातील ती मिजास, ती ऐट बरोबर उतरू शकली नाही, अशी रूखरूख राहते.

अनुवाद करताना संदर्भही ध्यानात घ्यावा लागतो. मागे एकदा एका गृहस्थाने केलेला अनुवाद माझ्याकडे तपासण्यासाठी आला होता. चाफळच्या राममंदिरातील रामजन्मोत्सवाचे वर्णन होते -

*पुढे उभा कपीवीर । पूर्वेकडें लंबोदर*

*खाले दाटला दरबार । नानापरी ॥*

*दमामे चौघडे वाजती । धडके भांड्याचे वाजती ।*

*फौजा भक्तांच्या साजती । ठायीं ठायीं ॥*

*क्षिरापतीची वाटणी । जेथे जाली बहु दाटणी*

*पैसा नाहीं राजांगणीं । दाटी झाली ॥*

त्या गृहस्थांना 'भांड्याचे धडके' हे 'बर्तनों की खड़खड़ाहट' वाटली व राजांगणांतील 'पैसा', 'रुपया, धन' वाटला. समारंभ म्हटल्यावर जेवणावळीसाठी भांडी व पैसा लागला असेल, असे त्यांना वाटले असणार. पण त्या काळचे रीतिरिवाज व शब्द जाणून घेणे अगत्याचे असते. तसे त्यांनी केले असते तर ही 'तोफांची सलामी' होती, रामजन्माच्या आनंदाची अभिव्यक्ती होती व 'पैस' म्हणजे

देवळाच्या अंगणात मोकळी जागा शिल्लक राहिली नाही हा भाव त्यांच्या ध्यानात आला असता.

कधी कधी आपण डोळे मिटून शब्दांचा प्रयोग करीत असतो. मारुतीची आरती घराघरात म्हटली जाते. "सत्राणे उड्डाणे हुंकार वदनीं । करी डळमळ भूमंडळ, सिंधूजळ, गगनीं ।" पण यांतील शब्दांच्या अर्थाकडे आपले लक्ष जात नाही. ते 'सत्रा णे' नसून - सतराचा त्याच्याशी काहीही संबंध नाही. 'स त्राणें' मोठ्या शक्तीने त्याने हुंकार भरून, बुभुत्कार करून उड्डाण केले हे सांगितले आहे. 'त्राण' म्हणजे शक्तीशी त्याचा संबंध आहे हे बारकाईने वाचल्यावर लक्षात येते. या आरतीतील 'भरभरला', 'कडकडले', 'धगधगला' आदींचा अनुवाद करणे कठीण आहे. मी जो प्रयत्न केला तो असा -

*बलसहित उड्डाण हुँकार मुख में*
*थरथर भूमंडल सिंधुजल नभ में*
*कड़कड़ करे ब्रह्माण्ड भय छाया त्रिभुवन में*
*सुरवर नर निशाचर लगे पलायन में ॥ १ ॥*
*जयदेव जयदेव जय हनुमंत*
*तुम्हारे प्रताप से न डरा सके कृतांत ॥ धृ ॥*
*गूँज उठा पाताल करता प्रतिशब्द*
*डगमग हो धरणीधर करता वह खेद*
*कड़कड़ करते पर्बत उडुगण उच्छेद*
*राम में लीन रामदास को हुआ शक्तिबोध ॥ २ ॥*

'पळणी', 'दुमदुमले', 'कडाडिले' या शब्दांचा अनुवाद होऊ शकला नाही. म्हणजे या शब्दांनी सुचवल्या जाणाऱ्या अर्थच्छटांचा, त्या भयचकित जगाचा, कोसळणाऱ्या नक्षत्रांचा, शेषाच्या स्थितीचा अनुवाद होऊ शकला नाही.

याप्रमाणेच करूणाष्टकातील 'तुझा दास मी व्यर्थ जन्मासी आलो', 'बुद्धि रे रघुनायका', 'समर्थ जनीं घेतला भार माझा'चा अनुवाद करणे फार कठीण झाले.

अनुवाद करताना जाणवते ते त्या त्या शब्दांचे वैभव, सामर्थ्य, नेमकेपणा, अर्थगंभीरता व ते अनुवादित करताना जाणवते आपली मर्यादा. काही ठिकाणी 'समर्थाचिया सेवका वक्र पाहें'चे भाषांतर 'समर्थ के दास को जो आँखें दिखाए' किंवा रामाच्या ऐवजी 'रामजी' वगैरे करताना थोडेसे तरी काही साधल्याप्रमाणे वाटते पण जास्त करून 'छेः! पूर्ण भाव काही येऊ शकला नाही.' ही भावना काही

शब्द, काही पंक्तींबाबत राहूनच जाते.

'विन्दांशु', १३, तेजस सहकारी गृहरचना म., तेजसनगर, कोथरूड, पुणे ४११ ०३८.

## सूचना फलक

वर्ष २१:३ पावसाळा २००३ अंकातील मुद्रित चुकांबद्दल दिलगिरी व्यक्त करत आहोत.

| पृष्ठ | ओळ | शब्द असा आहे | शब्द असा वाचावा |
|---|---|---|---|
| २७ | खालून १० | का नो | कौ नो |
| २७ | खालून ६ | सामर्थ्य | साधर्म्य |
| ३३ | खालून ६ | गायुर्भी | गायुभी |
| ३४ | खालून १३ | वाहङ्ला | वाहडला |
| ३४ | वरून ८ | कळलोहे | कळलाहे |
| ३६ | वरून १२ | रुक्भांगदचरित्र | रुक्मांगदचरित्र |
| ३६ | वरून १६ | सप्रम्यना | सप्रम्यन्त |
| ३९ | वरून १२ | साला | साळा |
| ४१ | खालून ४ | यांची ग्रंथ | यांचा ग्रंथ |
| ४३ | १०वी | कान्हरे | कान्हरो |
| ४३ | खालून ६वी | कानाच | काणाच |
| ४३ | खालून २री | तिर्थक् | तिर्यक् |
| ४४ | वरून तिसरी | विलोप | विलोम |
| ४५ | ११वी | कार्ये ही | कार्येही |
| ४५ | मध्यभागी | रागांचा | रागाचा |
| ४५ | खालून ८ | व्याख्यानवजा | व्याख्या वजा |
| ४५ | खालून ६ | बिहागण | बिहागडा |
| ४५ | खालून ३ | काळानुगामी | कलानुगामी |
| ४६ | मध्यभागी | विशेषण कर्तृत्व | कर्तृक |
| ४७ | खालून १२ | कनुवाजे | घनुवाजे |
| ४८ | वरून ८ | कन्जदिय | कन्नडिग |
| ४८ | वरून १० | बालू जाणे | बोलू जाणे |
| ४८ | मध्यभागी | ही दैवत | हे दैवत |
| ४८ | मध्यभागी | सरकश | सरकरा |
| ५४ | वरून १ | पाढे होतेही | पाढे पाठ होतेही |

# कौटिलियम् अर्थशास्त्र : भाषिकदृष्ट्या अवलोकन

मीनल परांजपे

कौटिल्य किंवा चाणक्य किंवा विष्णुगुप्त हे नाव भारतीयांना सुपरिचित आहे. कौटिल्य म्हणजे नंद साम्राज्य उखडून टाकून चंद्रगुप्त मौर्याची मगधाच्या सिंहासनावर स्थापना करणारा आचार्य हेही बहुतेकांना माहीत आहे. याचबरोबर कौटिल्याने किंवा चाणक्याने अर्थशास्त्र नावाच्या ग्रंथाची रचना केली हेही आपल्याला माहीत आहे. परंतु अर्थशास्त्र या नावामुळे कित्येकांचा हा ग्रंथ ('इकॉनॉमिक्स')शी संबंधित असावा असा समज आहे. आताच्या काळात जरी 'अर्थ' या शब्दाचा 'अर्थ' संपत्ती, धन याच्याशी संबंधित असला तरी पूर्वी म्हणजे दीड ते दोन हजार वर्षांपूर्वी त्याचा अर्थ हा काहीसा वेगळा होता. कौटिल्यानेच त्याची उपपत्ती खालील प्रमाणे दिली आहे. "मनुष्याणां वृत्तिरर्थः, मनुष्यवती भूमिरित्यर्थः । तस्याः पृथिव्या लाभपालनोपायः शास्त्रम अर्थशास्त्रमिति । (कौ.अ.१५.१.१-२) म्हणजेच "अर्थ म्हणजे मनुष्यांची उपजीविका, म्हणजेच मनुष्यांची वस्ती असलेली भूमी. त्या (भूमीचा म्हणजे) पृथ्वीचा लाभ आणि तिचे पालन यांचे उपाय सांगणारे शास्त्र ते अर्थशास्त्र. (होय)" भूमीचा लाभ करून घेणे, म्हणजेच जिंकणे, तिचे रक्षण करणे व तिचे पालन करणे ही राज्यसंस्थांचीच कामे असतात. ह्यावरून हे स्पष्ट होते की हा राज्यकारभाराविषयीचा ग्रंथ आहे. म्हणजेच हा विषय 'पोलिटिकल सायन्स' याच्याशी जास्त निगडीत आहे.

कौटिल्य अर्थशास्त्र या ग्रंथाचे दुसरे महत्त्व म्हणजे आज संपूर्णावस्थेत असे फारच थोडे ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यातून अत्यंत थोडे ग्रंथ असे आहेत की ज्याचा ग्रंथकर्ता आणि काळ निदान बऱ्याच प्रमाणात निश्चित करता येतो. यावर उलट सुलट बरीच चर्चा व संशोधन होऊन बहुतेक विद्वानांनी हे मान्य केले आहे की या ग्रंथाचा कर्ता कौटिल्य वा चाणक्य वा विष्णुगुप्त हाच असून हाच चंद्रगुप्त मौर्याचा आचार्य व चंद्रगुप्त मौर्याला मगधाच्या सिंहासनावर प्रस्थापित करणारा होय. यामुळेच त्याचा काळ म्हणजे ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकाचा शेवटचा चरण असा निश्चित करता येतो. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे या ग्रंथाचा विषय व त्याचे स्वरूप. हा ग्रंथ अभ्यासकांना उपलब्ध होण्याअगोदर प्राचीन भारतीयांना

केवळ धार्मिक बाबींतच रस होता. कथा, काव्य, नाटक या शिवाय केवळ तत्त्वज्ञान विषयक, अध्यात्म या विषयांत रस होता. या शिवाय दैनंदिन जीवनात लागणाऱ्या सामान्य गोष्टींचा विचार केला जात नव्हता, असे वाटते. परंतु हा ग्रंथ इहलोकीचाही विचार करणारा आणि तोसुद्धा धर्मनिरपेक्ष रितीने करणारा म्हणून भारतीयांना, अभ्यासकांना सुखद धक्का देणारा ठरणारा.

सर्वसामान्यतः कोणत्याही प्राचीन ग्रंथांची सुरुवात ही 'श्री गणेशाय नमः' तर होतेच पण त्याबरोबर त्या ग्रंथाची मायथॉलॉजिकल मिथक परंपरा ही सांगितली जाते. पण ह्या ग्रंथात सुरुवातीला शुक्र व बृहस्पती या आद्य राजनीतीज्ञांना नमन करून सरळ विषयाला हात घातला आहे.

आता यापुढील प्रश्न वाचकांच्या मनात उभा राहील की याचा भाषाशास्त्राशी काय संबंध? प्रत्यक्ष संबंध जरी येत नसला तरी काही दृष्टिकोनातून 'कौटिलीयम् अर्थशास्त्रा'चा अभ्यास हा महत्त्वाचा ठरू शकतो.

१) **पारिभाषिक भाषा :-** हा ग्रंथ राज्यकारभार विषयक असल्यामुळे प्रशासनविषयक अनेक पारिभाषिक संज्ञांचा उगम आपल्याला येथे आढळतो.

उदा. **समाहर्ता** - (निरनिराळ्या प्रकारचे कर व त्याची वसुली करणारा, त्याचा हिशेब पहाणारा त्याचबरोबर खर्चाचा हिशेब करून त्याचा ताळेबंद ठेवणारा.) (कौ.अ. २.६)

**संनिधाता :-** वेगवेगळ्या कामांसाठी ठिकठिकाणी कोठारे बांधून घेऊन त्यावरील अध्यक्षांच्या कामावर देखरेख ठेवणारा. (पण्यगृह = विक्रेय वस्तूंचे भांडार, कोष्ठागार = धान्यादीचे कोठार, कुप्यगृह = जंगलातून मिळणाऱ्या मालाचे कोठार इ.) (कौ.अ.२.५)

परंतु याव्यतिरिक्त असे अनेक शब्द आहेत ते सहसा इतर ग्रंथात आढळत नाहीत किंवा ज्या अर्थाने ह्या ग्रंथात वापरले आहेत त्या अर्थाने ते इतरत्र वापरले गेले नाहीत.

२) **दुर्मिळ शब्द किंवा नेहमीपेक्षा वेगळ्या अर्थाने वापरले जाणारे शब्द :-** उदा. अनर्थ्य = अनर्थकारक मनुष्य (कौ .अ. १.७)

अपरुद्ध = राजाची गैरमर्जी असलेला राजपुत्र (कौ.अ. १.१० व १.१८)

त्याचबरोबर कायदा हा प्रशासनाचा अत्यंत महत्त्वाचा भाग असल्याने निरनिराळ्या कायद्यांची सूची, त्यांचे वर्गीकरण, न्यायव्यवस्था, न्यायदान पद्धत ह्या सर्व बाबींचा विचार अर्थशास्त्रात करताना त्या विषयीचेही काही पारिभाषिक

शब्द आपल्याला आढळतात.

३) **कायदा विषयक पारिभाषिक शब्द :-** उदा. भर्मण्या = स्वतंत्र राहाणाऱ्या पत्नीला द्यायची पोटगी (कौ.अ. ३.३)

माणव = दरोडेखोर, गुन्हेगार (कौ. अ. ४,५)

स्थाप्या = विवाहसमयी स्त्रीच्या नावे बाजूस काढून ठेवलेली रक्कम (कौ.अ.३.२.१५) इत्यादी.

४) **प्राकृत भाषेवरून आलेली काही रुपे :-** तुट = सर्वात लहान काल विभाग. (कौ.अ. २.२०.२९)

षष्ठौही = प्रथमच गाभण राहिलेली गाय. (कौ.अ. २.२९ व शतपथ ब्रा. व इ. टीकाकार श्री. कंगले यांनी दाखविल्याप्रमाणे, कौ.अ. (मराठी) पा.६४४).

मक्कुण = सुळे नसलेला हत्ती. (कौ.अ. २.३१)

५) या व्यतिरिक्त काही **देशी शब्दही** आढळतात.

उदा. चेल्ल = वस्त्र (कौ.अ.२.१४.५३)

कण्डोलिका = करंडी

विक्क = हत्तींचे पिल्लू (कौ.अ. २.३१)

हे झाले शब्द संपत्ती विषयी. त्याचबरोबर उत्तम लेखन कसे करावे याबद्दल ही कौटिल्याने विचार केलेला आढळतो. प्रथम कौटिल्याने ह्या ग्रंथाची रचना का केली व कशी केली हे सांगितले आहे तिथून सुरुवात केली आहे. ह्या ग्रंथाच्या शेवटी कौटिल्य म्हणतो, "दृष्टवा विप्रतिपत्तिं बहुधा शास्त्रेषु भाष्य कारणाम् । स्वयमेव विष्णुगुप्तश्चकार सूत्रंच भाष्यंच ॥" (कौ.अ. १५ शेवटचा श्लोक) म्हणजे - शास्त्रांवरील भाष्यकार पुष्कळ प्रकारच्या चुका करीत असलेले पाहून विष्णुगुप्ताने स्वतःच सूत्र आणि भाष्य दोहोंची रचना केली.

ह्याच अधिकरणात त्याने आपल्या ग्रंथ रचनेत ज्या निरनिराळ्या विवेचन पद्धती वापरल्या आहेत त्यांचे उदाहरणासहीत स्पष्टीकरण दिले आहे. प्रत्येक विवेचन पद्धतीची व्याख्या तसेच पारिभाषिक शब्द देऊन त्यापुढे आपल्या ग्रंथात तो कसा वापरला आहे त्याचे उदाहरणच दिले आहे. असे एकूण बत्तीस पारिभाषिक शब्द, त्यांच्या व्याख्या व उदाहरणे आपल्याला आढळतात. (कौ.अ.१५वे अधिकरण.) स्थलसंकोचामुळे इथे सर्वच देणे शक्य नसल्याने आपण फक्त काही उदाहरणे बघू.

**अधिकरण :-** यमर्थमधिकृत्योच्यते तदधिकरणम् । (कौअ.१५.१.४.)

ज्या विषयासंबंधी सांगितले जाते तो विषय म्हणजे अधिकरण.

**विधान** :- शास्त्रक्य प्रकरणानुपूर्वी विधानम् । (कौ.अ.१५.१.६)

शास्त्रातील प्रकरणांचा क्रमवार निर्देश म्हणजे विधान. यालाच सध्या आपण अनुक्रमणिका म्हणतो.

**उद्देश** :- समासवाक्यमुद्देशः । (कौ.अ.१५.१.१५.)

एखाद्या गोष्टीचे थोडक्यात प्रतिपादन करणे म्हणजे उद्देश.

**अर्थापत्ति** :- यदनुक्तमर्थादापद्यते साऽर्थापत्तिः । (कौ.अ.१५.१.२९.)

जे सांगितले नसताही अर्थापासून निष्पन्न होते ती अर्थापत्ती । याचे उदाहरण - 'लोकयात्रविद्राजानमात्मद्रव्य प्रकृतिसंपन्नं प्रियहितद्वारेणाश्रयेत' (कौ.अ. ५.४.१.) "लोक व्यवहार जाणणाऱ्या मनुष्याने आत्मगुणांनी व द्रव्यप्रकृतींच्या गुणांनी संपन्न अशा राजाच्या आश्रयास त्याला प्रिय असणाऱ्या व त्याचे हित पाहाणाऱ्या मनुष्यामार्फत जावे." 'नाप्रियहितद्वारेणाश्रयेत इत्यर्थादापन्न भवतीति', (कौ.अ.१५.१.३१) म्हणजे त्याला (राजाला) अप्रिय असणाऱ्या व अहित करणाऱ्या मनुष्यामार्फत आश्रयास जाऊ नये असे त्या अर्थापासून निष्पन्न होते.

कौटिल्य अर्थशास्त्रात सांगितलेल्या विवेचन पद्धती, त्यांचे पारिभाषिक शब्द व व्याख्या व इतर ग्रंथातील समान विषयाचे पारिभाषिक शब्द यांची तुलना करणे खूप अभ्यासपूर्ण होऊ शकेल.

कौटिल्य अर्थशास्त्रातील दुसऱ्या अधिकरणातील १० वा अध्याय वाचल्यास उत्तम लिखाणाविषयी कोणते गुण कौटिल्याला आवश्यक वाटतात हे तर आपल्याला समजतेच परंतु काही महत्त्वाच्या शब्दांच्या जातींच्या व्याख्याही आपल्याला मिळतात. विशेष म्हणजे हा अध्याय आज्ञापत्रांचा सर्व बाजूंनी विचार करणारा आहे.

सरकारी आज्ञापत्रे ज्याला कौटिल्याने 'शासन' असा शब्द वापरला आहे ही अत्यंत महत्त्वाची असतात. कौटिल्याचे अर्थशास्त्र हा ग्रंथ राज्यकारभार विषयक असल्याने आज्ञापत्रांचा विचार करणे स्वाभाविकच आहे. हे करताना कौटिल्याने आपण कोणती काळजी घेतली आहे ते खालील श्लोकात सांगितले आहे.

सर्वशास्त्राण्यनुक्रम्य प्रयोगमुपलभ्यच ।

कौटिल्येन नरेंद्रार्थे शासनस्य विधिः कृतः ॥ (कौ.अ.२.१०.६३)

म्हणजे सर्व शास्त्रांचे आलोडन करून आणि प्रत्यक्ष प्रयोगांची माहिती करून घेऊन कौटिल्याने राजांसाठी आज्ञापत्रांविषयींचे हे नियम तयार केले आहेत.

कौटिल्याने आज्ञापत्रांचे महत्त्वही खालील शब्दात सांगितले आहे.

शासनप्रधाना हि राजानः तन्मूलत्वात्संधि विग्रहयोः। (कौ.अ. २.१०.२)

म्हणजे राजे शासनावरच (म्हणजे आज्ञापत्रावरच) मुख्यतः अवलंबून असतात, संधि व विग्रह यांचे मूळ शासनात आहे या कारणास्तव या विषयांची विभागणी कौटिल्याने खालीलप्रमाणे केली आहे.

१) काही व्याकरण विषयक पारिभाषिक संज्ञा व त्यांचे स्पष्टीकरण.

२) उत्तम आज्ञापत्राची लक्षणे किंवा गुण.

३) सदोष आज्ञापत्राची लक्षणे किंवा त्यातील अवगुण / दोष.

४) आज्ञापत्र लेखकासाठी आवश्यक असणारे गुण.

५) आज्ञापत्रांचे प्रकार.

६) आज्ञापत्रातून प्रकट होणारे भाव.

आपण एकामागोमाग एक सर्व घटकांची माहिती घेऊ.

१) व्याकरण विषयक पारिभाषिक संज्ञा व त्यांचे स्पष्टीकरण.

सर्वप्रथम म्हणजे कौटिल्याने म्हटले आहे "अकारादयो वर्णस्त्रिषष्टिः ।" (कौ.अ. २.१०.१३-२१) म्हणजे अकारादी वर्ण त्रेसष्ट आहेत. त्याने सर्व त्रेसष्ट वर्णमात्र दिलेले नाहीत.

'शब्द - पद = वर्णसंघातः पदम् ।' (तत्रैव) म्हणजे वर्णांचा समूह म्हणजे पद (शब्द)

"तच्चतुर्विध नामाख्यातोपसर्गनिपाताश्चेति ।" (तत्रैव)

म्हणजे ते (शब्द/पद) चार प्रकारचे - नाम, आख्यात, उपसर्ग आणि निपात.

यासर्व संज्ञांच्या व्याख्या पुढील प्रमाणे देण्यात आल्या आहेत.

**नाम** :- "तत्रनाम सत्त्वाभिधामि ।"

म्हणजे त्यापैकी नाम हे सत्त्वाचे (अस्तित्त्व असणाऱ्या पदार्थांचे) वाचक

**आख्यात** :- "अवशिष्टलिङ्गमाख्यातं क्रियावाचि ।" म्हणजे लिंगभेदरहित आख्यात क्रियेचे वाचक

**उपसर्ग** :- "क्रिया विशेषकाः प्राद्य उपसर्गाः ।"

म्हणजे क्रियेची विशेषता दाखविणारे प्र आदी हे उपसर्ग होत.

**निपात** :- "अव्ययाश्चादयो निपाताः ।" (कौ.अ. २.१०.१९)

च आदी अव्यये निपात होत.

यानंतर वाक्य कशाला म्हणावे हे सांगितले आहे.

**वाक्य** :- "पदसमूहो वाक्यमर्थपरिसमाप्तौ ।" (कौ.अ.२.१०.२०)

म्हणजे ज्यात अर्थाची परिसमाप्ती होते अशा पदसमूहाला वाक्य म्हणतात.

**वर्ग** :- "एकपदावर स्त्रिपदपरः परपदार्थनुपरोधेन वर्गः कार्यः ।" (कौ.अ. २.१०.२१)

म्हणजे इतर शब्दांच्या अर्थाला बाध येणार नाही अशा रीतीने कमीतकमी एक शब्दाचा आणि जास्तीतजास्त तीन शब्दांचा एक वर्ग करावा.

लेखाची समाप्ती दाखविण्यासाठी 'इति' शब्द आणि 'अमक्याचे हे वचन' असे लिहावे. (कौ.अ. २.१०.२२.) यातील या सर्व संज्ञांची, अर्थशास्त्रापूर्वीच्या विविध ग्रंथांची नंतरच्या विविध ग्रंथांशी तसेच मौर्यकाळातील शिलालेखांची तुलना करणे, त्यातील बदल व साम्य शोधणे हे स्वतंत्र लेखमालेचे विषय होऊ शकतात. निदान यावरून ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकाच्या अखेरीस या संज्ञा होत्या हे तरी आपल्याला नक्की लक्षात येते.

२) आता आपण अर्थशास्त्रात सांगितलेली उत्तम आज्ञापत्रांची लक्षणे किंवा गुण पाहू.

"अर्थक्रमः संबन्धः परिपूर्णता माधुर्यमौदार्यं स्पष्टत्वमिति लेखसंपत् ।" (कौ.अ.२.१०.६)

म्हणजे अर्थाचा क्रम, संगतवारपणा, परिपूर्णता, माधुर्य, औदार्य आणि स्पष्टता हे लेखाचे गुण होत.

आता या प्रत्येकाची अर्थशास्त्रात दिलेली व्याख्या बघू या.

**अर्थक्रमः** :- "तत्र यथावदनुपूर्वक्रिया प्रधानस्यार्थस्य पूर्वमभिनिवेश इत्यर्थक्रमः ।" (कौ.अ.२.१०.७-१२)

म्हणजे त्यात उचित असा क्रम लावणे, मुख्य गोष्टीचा प्रथम निर्देश करणे म्हणजे अर्थक्रम होय.

**संबन्धः** :- "प्रस्तुतस्यार्थस्यानुपरोधादुत्तरस्य विधानमा समाप्तेरिति संबन्धः ।"

म्हणजे प्रारंभी निर्दिष्ट केलेल्या अर्थाशी विसंगती न आणता नंतरच्या गोष्टींचा लेखसमाप्तीपर्यंत निर्देश म्हणजे संबंध होय.

**परिपूर्णता** :- "अर्थपदाक्षराणामन्यूनातिरिक्तता हेतूदाहरणदृष्टान्तैरर्थोपवर्णनाश्रान्तपदतेति परिपूर्णता ।"

म्हणजे अर्थ, पदे व अक्षरे ही कमी किंवा अधिक नसणे. कारणे, उदाहरणे

आणि दृष्टांत यांच्या साह्याने अभिप्रेत आशयाचे स्पष्टीकरण करताना शब्द उणे पडू न देणे ह्याला परिपूर्णता म्हणतात.

**माधुर्य :-** "सुखोपनीतचार्वर्थशब्दाभिधानं माधुर्यम् ।"

म्हणजे सहज प्रतीत होणारा सुंदर अर्थ असलेल्या शब्दांची योजना म्हणजे माधुर्य.

**औदार्य :-** "अग्राम्यशब्दाभिधानमौदार्यम् ।"

म्हणजे ग्राम्य शब्दांची योजना न करणे म्हणजे औदार्य.

**स्पष्टता :-** "(स्पष्टत्व) प्रतीत शब्दप्रयोगः स्पष्टत्वमिति ।" (कौ.अ. तत्रैव) म्हणजे सर्वांना परिचित असलेल्या शब्दांचा वापर म्हणजे स्पष्टत्व. आज्ञापत्रे ही मुळात सर्वसामान्य लोकांना कळण्यासाठी असतात किंवा ज्या व्यक्तीला मग ती कोणीही असो उद्देशून ती असतात तिला त्यातील अर्थ, भाव हे स्पष्टपणे निःसंदिग्धपणे कळावे हे महत्त्वाचे असते.

हा विचार करता आता जी आज्ञापत्रे किंवा परिपत्रके किंवा सरकारकडून आलेले पत्र, दस्तऐवज या कसोटीला कितपत उतरतात?

कित्येक परिपत्रकातील किंवा आज्ञापत्रातील भाषा ही सर्वसामान्यांनाच काय पण तज्ज्ञ मंडळींना ही कधीकधी अनाकलनीय अशी ठरते. त्यातून वेगवेगळे अर्थ काढून कोर्टापर्यंत जाण्याचीही वेळ येते. त्यात काल, पैसा, मनुष्यबळ सर्वांचाच व्यय होतो.

आज्ञापत्राचे कौटिलीय अर्थशास्त्रात दिलेले अवगुण किंवा दोष आता बघू.

"अकान्तिर्व्याघातः पुनरुक्तमपशब्दः संप्लव इतिलेख दोषाः ।" (कौ.अ. २.१०.५७-६२)

म्हणजे अकान्ती, व्याघात, पुररुक्त, अपशब्द आणि संप्लव (गोंधळ) हे पाच दोष आहेत.

**अकान्ती :-** लिहिलेले पान काळे असणे, सुंदर नसलेली, लहान मोठी व पुसट अक्षरे असेण म्हणजे अकान्ती.

**व्याघात :-** पुढच्याची मागच्याशी संगती नसणे म्हणजे व्याघात.

**पुनरुक्त :-** एकदा म्हटलेले काही फरक न करता पुन्हा उच्चारणे म्हणजे पुनरुक्तः.

**अपशब्द :-** लिंग, वचन, काळ आणि विभक्ती यांचा चुकीचा उपयोग म्हणजे अपशब्द.

**संप्लव :-** जेथे वर्ग करावयास नको तेथे तो करणे आणि जेथे वर्ग करणे आवश्यक तेथे तो न करणे अशी विपर्यस्तता म्हणजे संप्लव किंवा गोंधळ. (कौ.अ. तत्रैव)

आता यावरून आपल्या असे लक्षात येते की आज्ञापत्रांचे लेखन करणारा हा खरोखरच सुशिक्षित, प्रशिक्षित, अनेक गुण संपन्न असा असला पाहिजे.

४) आज्ञापत्रलेखकासाठी आवश्यक असणारे गुण अर्थशास्त्रात खालीलप्रमाणे सांगितले आहेत.

"तस्मादमात्यसंपदोपेतः सर्वसमयविदाशुग्रन्थश्चार्वक्षरो
लेखनवाचनसमर्थो लेखकः स्यात् ।" (कौ.अ. २.१०.३-५)

शासन म्हणजे आज्ञापत्रावर राजे अवलंबून असल्याने लेखक अमात्यांना आवश्यक असणाऱ्या अशा सर्व गुणांनी संपन्न (कौ.अ.१.९.१), सर्व संकेत जाणणारा, लवकर वाक्यरचना करणारा, सुंदर अक्षर असणारा आणि लिहिलेले वाचण्यात वाकबगार असावा.

उत्तम अमात्याची लक्षणे अर्थशास्त्रात खालील प्रमाणे सांगितली आहेत. "जानपदोऽभिजातः स्ववग्रहः कृतशिल्पश्चक्षुष्मान्प्राज्ञो धारयिष्णुर्दक्षो वाग्मी प्रगल्भः प्रतिपत्तिमानुत्साह प्रभावयुक्तः क्लेशसहः शुर्चिर्मैत्रो दृढभक्तिः शीलबलारोग्य-सत्वयुक्तः स्तम्भचापलहीनः संप्रियो वैराणामकर्तेत्यमात्य संपत् ।" (कौ.अ. १.९.१)

म्हणजे आपल्या राज्याचा नागरिक, चांगल्या कुळात जन्मलेला, ताब्यात ठेवण्यास सुलभ, कलांमध्ये प्रवीण, शास्त्ररूप नेत्र असलेला, बुद्धिमान, स्मरणशक्ती असलेला, कुशल, बोलण्यात वाकबगार, धीट, समयसूचकता असलेला उत्साह व सामर्थ्य यांनी युक्त, क्लेश सहन करणारा, शुद्ध आचरणाचा, मैत्री करू शकणारा, दृढ स्वामिभक्त शील, बल, आरोग्य आणि सत्त्व यांनी युक्त, ताठा चंचलतारहित कोणालाही प्रिय होणारा, व कोणाशीही वैर न करणारा असावा. ही सर्वगुण संपन्न अमात्याची लक्षणे आहेत.

५) आज्ञापत्रांचे प्रकार थोडक्यात पाहू.

**प्रज्ञापना** - एखाद्या व्यक्तीने काही माहिती राजाला कळवली आहे यासंबंधी असतो तो प्रज्ञापनालेख.

**आज्ञा :-** नियमन किंवा अनुग्रह याविषयी असणाऱ्या लेखाला आज्ञालेख असे म्हणतात.

**उपग्रह :-** एखाद्याच्या गुणांच्या अनुरोधाने सत्कार करणारा त्याच्या मानसिक त्रासाच्या समयी व त्याला, बक्षिस देताना लिहिलेला तो उपग्रहलेख.

**परिहार :-** राजाच्या आज्ञेवरून विशिष्ट जातींवर आणि शहरांवर गावांवर प्रदेशांवर अनुग्रह केलेला सांगणारा तो परिहार.

**निसृष्टिलेख :-** कार्य करण्याच्या संबंधात आणि हुकूम देण्याच्या संबंधात अधिकार देणे. हे दोन प्रकारचे आहेत. अ) वाचिक - तोंडी हुकूम देण्याचा अधिकार असलेला. आ) नैसृष्टिक - कार्य करण्याचा अधिकार देणारा असे निसृष्टिलेख.

**लेख** – विविध प्रकारच्या दैवी घटनांविषयी किंवा मनुष्यांनी केलेल्या खऱ्या घटनांविषयी असतो त्यास लेख अशी संज्ञा आहे.

**प्रतिलेख :-** जसा लेख असेल तसा राजाला वाचून दाखवून उत्तरादाखल राजाचे वचन जसे असेल तसे लिहिलेला तो प्रतिलेख.

**सर्वत्रग लेख :-** ज्यात वाटसरूंच्या संरक्षणासाठी आणि मदतीसाठी राजाने राजकुलीनांना व अधिकाऱ्यांना नियम घालून दिलेले असतात, मार्गात व देशात सर्वत्र जाहीर केलेला असा सर्वत्रग लेख. (कौ.अ. २.१०.३८ ते ४६.)

६) आज्ञापत्रातील भाव

ही आज्ञापत्रे आपल्या राज्यातील नागरिक, अमात्य, मंत्री, दूत, यांना उद्देशून असतच पण त्या बरोबर इतर देशातील राजांनाही उद्देशून असत. त्यातील जो कार्यभाग साधायचा असेल त्या प्रमाणे ह्या आज्ञापत्रांमध्ये **निंदा** (दोषांचा निर्देश) **प्रशंसा** (गुणांचा निर्देश) **पृच्छा** (प्रश्न विचारणे) याप्रमाणे असे सांगणे कथन करणे, **आख्यान अर्थना** द्या - मागणी, **प्रत्याख्यान** - नकार, **उपाचंभ** टोमणा **प्रतिषेध** - करू नको असे सांगणे, **चोदना** - 'हे कर' प्रवृत्त करणारे वचन, **सान्त्वः** - तुम्ही व आम्ही एकच आहोत असे सांत्वन करणे, **अभ्युपपत्ती** - संकट समयी साह्य करणे, **अभिभर्त्सन** - 'पुढे जड जाईल इत्यादी. धमकी व **अनुनय** - सर्व प्रकारांनी वश करून घेणे हे ३ गोष्टींसाठी.

१. कार्यसिद्धी करून घेण्यासाठी २. स्वतःच्या अतिक्रमणाबद्दल क्षमेसाठी आणि ३. मनुष्य आदीवरील संकटाच्या निवारणासाठी, असे विविध भाव व अर्थ या आज्ञालेखातून प्रतीत होतात. (कौ.अ. २३-३७) वरील मुद्यांवरून काही महत्त्वाच्या गोष्टी लक्षात येतात.

१) यावरून ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकात वापरात असलेल्या काही व्याकरण विषयक संज्ञांची ओळख होते.

२) राज्यकारभार हाच विषय असल्याने आज्ञापत्राचे लेखन त्याचे प्रकार त्यातील गुणदोष यांचा सांगोपांग विचार केलेला आढळतो.

३) आज्ञापत्रातील भाषेतून नेमका कोणता अर्थ व भाव प्रतीत करण्यात आला पाहिजे त्यानुसार त्याची रचना करावी हा विचार पुढे येतो.

४) आज्ञापत्र लिहिणे हे त्याकाळी अत्यंत कौशल्याचे व मानाचे काम म्हणून गणले गेले असून आज्ञापत्र लिहिणारा सुशिक्षित, प्रशिक्षित तसेच महत्त्वाचे म्हणजे त्या देशाचा नागरिक असणे आवश्यक होते. अमात्याप्रमाणे गुणसंपन्न असे म्हटले आहे. अमात्याची निवड करण्यासाठी अर्थशास्त्रात काही कसोट्या व चाचण्या दिल्या आहेत, त्याच आज्ञापत्र लेखकासाठी असाव्यात असे दिसते.

५) पुढील संशोधनासाठी दिग्दर्शन - वरील माहितीवरून पुढील संशोधनासाठी खालील विषय सुचू शकतात.

१) अर्थशास्त्र, त्या आधीचे ग्रंथ व नंतरचे ग्रंथ यातील त्याच व्याकरण संज्ञांविषयीचे विचार त्यातील साम्य व भेद.

२) अशोकाचे शिलालेख व अर्थशास्त्रातील विचार यांची तुलना.

३) पुढील काळातील राजनीतिशास्त्रातील ग्रंथातील आज्ञापत्रांबद्दल व अर्थशास्त्रातील आज्ञापत्रांबद्दलचा विचार आणि तुलना.

उदा. कामंदकीयनीतिशास्त्र, शुक्रनीति, रामचंद्र पंत अमात्य यांच्या आज्ञापत्रांविषयी इत्यादी हे प्राथमिक स्वरूपाचे काम असून यावरील अधिक सूचना, माहिती, संदर्भ यांचे स्वागतच होईल.

■

**के ६०२, महेश्वरीनगर, एम.आय.डी.सी., कोंडिविटे, अंधेरी (पूर्व), मुंबई - ४०० ०९३**

**(संदर्भ - कंगले र.पं., 'कौटिलियम् अर्थशास्त्र : सटीप मराठी भाषांतर' म.रा.सा.मं. मुंबई १९८२.)**

## सूचना फलक

**निवेदन -** अडतिसावे अखिल भारतीय मराठी विज्ञान संमेलन २०, २१ डिसेंबर २००३ रोजी गडकरी रंगायतन, ठाणे येथे भरणार आहे.

**संपर्क पत्ता** - मराठी विज्ञान परिषद ठाणे विभाग,
द्वारा - भानुशाली हॉस्पिटल, स्टेशन रोड, ठाणे ४०० ६०१.
दू. क्र. २५३३१२१२ / २५३३२७४१
ई-मेल - habhanushali@yahoo.com

# बोलीच्या अनुषंगाने कवीचा स्थाननिश्चय

हरिश्चंद्र बोरकर

महाराष्ट्राची भाषा मराठी असली तरी तिच्या वेगवेगळ्या बोली विभिन्न प्रदेशात बोलल्या जातात. खानदेशात बोलली जाणारी खानदेशी किंवा अहिराणी, कोकणातील मालवणी अथवा कुडाळी, वऱ्हाडातील वऱ्हाडी, नागपूर परिसरातील नागपूरी, वैनगंगेच्या पूर्वभागात बोलली जाणारी झाडी अशा मराठीच्या विविध बोली आहेत. तशी 'बारा कोसांवर बोली बदलते' ही आपली परंपरागत धारणा आहेच. तिला भाषाशास्त्रीय आधारही आहे. या सर्व बोलींमध्ये बोलणारी माणसे चारचौघात बोलताना मात्र प्रमाण मराठीचा वापर करताना दिसतात. तथापि ते बोलत असताना त्यांच्या मूळ बोलीतील काही विशेष त्यांच्या तोंडातून प्रकट झाल्यावाचून राहत नाही. आपण अस्खलित मराठी बोलतो असे स्वाभिमानाने म्हणणाऱ्या तथाकथित विद्वानाच्या मुखातूनदेखील त्यांच्या मूळ बोलीतील काही उच्चार व लकबी प्रयत्नांनंतरही लपून राहू शकत नाहीत हा आपला सर्वांचाच नित्याचा अनुभव आहे. वेगवेगळ्या परिसरातील मित्र एकत्र आले असता त्यांच्या बोलण्यातील ही भाषिक वैशिष्ट्ये स्पष्टपणे कानात भरल्यावाचून राहत नाहीत. अर्थात ती वैशिष्ट्ये असतात, वैगुण्ये नव्हेत हे मात्र लक्षात घेतले पाहिजे.

आपल्या प्राचीन मराठी ग्रंथांचे अवलोकन केले असता हीच प्रवृत्ती आपणास आढळून येते. मुकुंदराजांचा 'विवेकसिंधू', ज्ञानेश्वरांची 'भावार्थदीपिका' अथवा तुकारामांच्या 'अभंगांची गाथा' यांची उदाहरणे आपणास वानगीदाखल घेता येईल. त्या काळात 'प्रमाण मराठी' ही संज्ञा कदाचित जन्माला यायची असेल. प्रत्येक संत कवी जिला मराठी म्हणतात ती त्यांच्या परिसरातील बोलीच होती हे आता सिद्ध झालेले आहे. मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर या प्रारंभीच्या धुरिणांना त्यामुळेच आपल्या ग्रंथांच्या प्रास्ताविकातच मराठीची पाठराखण करावी लागली, संस्कृत आणि मराठीतील नाते त्यांना सांगावे लागले. पण हे मात्र तेवढेच सत्य आहे की आपण बोलतो आहोत ती मराठीच आहे हे काय या संदर्भात त्यांच्याही मनात अनिश्चितता असावी. परंतु ती संस्कृतपेक्षा भिन्न आहे हे मात्र त्यांना कळून चुकले होते. ही लोकांची बोली आहे म्हणून हिच्यातूनच आपण ग्रंथरचना करणे श्रेयस्कर ठरेल

असा त्यांचा ठाम समज झालेला होता. तथापि ही लोकांची बोली मराठी होय की प्राकृत होय याचा मात्र त्यांच्या मनात निश्चय होत नव्हता हे मात्र खरे.

प्रारंभीच्या काळात संस्कृतात रचना करण्याची वहिवाट असताना या संभ्रमाच्या मार्गाने त्यांचा प्रवास चालला होता. अशा खडतर परिस्थितीत त्यांना आत्माविष्कारार्थ किती लटपटी कराव्या लागत असतील याचा अंदाज आज लागणार नाही. समोर मोठमोठे संस्कृत ग्रंथ आदर्श म्हणून ठेवलेले आहेत, आपल्या आज्या-पणज्यांनी याच ग्रंथांचे अध्ययन करून त्याच देववाणी संस्कृतमध्ये ग्रंथरचना केलेली आहे. असे असताना आतापर्यंत ग्रंथात न आलेल्या नवीन भाषेचा, नव्हे बोलीचा आश्रय घेऊन तिच्यात आत्माविष्कार करताना या लोकांना काय सायास पडले असतील याची कल्पनाच करवत नाही. आज इंग्रजी ग्रंथांचे भाषांतर करताना आपण किती ठिकाणी अडतो? तरी बरे आहे, आपल्या हाताशी अनेकानेक शब्दकोश आणि संदर्भ ग्रंथ हात जोडून उभे आहेत. पण तेव्हा परिस्थिती इतकी सहज नव्हती. संस्कृत-मराठी शब्दकोश तर सोडा, पण संदर्भग्रंथ हा प्रकारही त्या काळी उदयास यावयाचा होता. अशा विपरीत अवस्थेत या ग्रंथकर्त्यांना आधार होता तो लोकांच्या तोंडातून नित्य निघणाऱ्या शब्दांचा. याच दैनंदिन शब्दांचा उपयोग करून या आपल्या आदिकवींनी आपले काव्य सजविले आहे असे दिसून येते.

म्हणूनच आज या पुरातन संहितांमधील अनेक शब्दांचे अर्थ आमच्या उच्चविद्याविभूषित समीक्षकांनादेखील लागू शकत नाहीत. या ग्रंथांच्या संहिता तपासून त्याचे संपादन करणाऱ्या संपांदकांचीही अशीच फसगत झालेली आपणास आढळून येते. त्यांनी सांगितलेले हे अर्थ अनेकदा चुकीचे आहेत असे दिसून येते. अर्थात ही त्यांची चूक आहे असे म्हणता येणार नाही. प्रारंभीच्या काळात त्यांनी अतिशय परिश्रमपूर्वक हे ग्रंथ संपादन करून त्यांनी करून त्यांची मुद्रित रूपात प्रकाशने उपलब्ध करून दिली. म्हणूनच आपणास हे सारे आज वाचायला मिळत आहे, हे विसरून चालणार नाही. त्यांचे हे उपकार कदापि फेडता येणार नाहीत. असे असले तरी त्यांनी अर्थांच्या बाबतीत केलेली गफलत दुर्लक्षित करून चालणार नाही.

केवळ प्रमाण मराठी व संस्कृत यांच्याच भरवशावर राहिल्यामुळे आणि बोलीचा विचार न केल्यामुळे या संपादनात अनेक चुका राहून गेल्या आहेत. मी नव्याने संपादित केलेल्या 'विवेकसिंधू' या मुकुंदराजांच्या ग्रंथात अशी

शंभराच्यावर उदाहरणे प्रस्तावनेत सोदाहरण दिलेली आहेत. त्याच्यापैकी केवळ एक उदाहरण पाहू.

'कल्पतरूचेनि पडिपाडें । जन्हि फळतीं घरिंचीं झाडें
तन्हि तियें वाडियेचेनि कोडें । न लावावीं कां ॥' (विवेक. १-२५)

या ओवीचा अर्थ लावताना 'वाडियेचेनि कोडे' 'वाढत्या आवडीने' असा अनुवाद स्वीकारून "वाढत्या आवडीने कल्पवृक्षाची लागवड का करू नये?" असा सरळ अर्थ आमच्या पूर्वसुरींनी केलेला आहे. येथे 'वाडी' या शब्दाचा अर्थ शेत किंवा बागायत हा स्वीकारला तर मुकुंदराजांना अभिप्रेत असलेला अर्थ आणखी खुलतो. 'वाडी लावण्याच्या इच्छेने कल्पवृक्षाची लागवड करावी' या स्पष्टीकरणात मुकुंदराजांची विश्वात्मक दृष्टी स्पष्ट होते. 'वाढत्या आवडीने' या स्पष्टीकरणात प्रस्तुत अर्थ येत नसल्यामुळे मुकुंदराजांवर अनवधानाने अन्याय केल्याचे पातक घडून जाते. नरेंद्रांनी आपल्या 'रुक्मिणी स्वयंवर' या काव्यातदेखील "कल्पद्रुमांची करिंजेत खोती" अशी ओळ वापरली आहे. पुढे ज्ञानेश्वरांनी हाच धागा पकडून "जो जे वांच्छिल तो ते लाहो" या ओळीत मुकुंदराजांचा 'वाडियेचेनि कोडे' या ओवीतील अन्वयार्थ आणला आहे, हे वेगळे सांगायलाच नको. बोलीतील अर्थाचे भान आणि ज्ञान नसल्यामुळे कसा अनर्थ अजाणता घडून जातो याचे हे एक उदाहरण म्हणायला हवे.

त्या त्या बोलींच्या अभ्यासकांनी आपल्या या प्राचीन ग्रंथांचे त्या बोलीच्या अनुषंगाने तात्काळ पुनर्विवेचन करण्याची किती आवश्यकता आहे हे या उदाहरणावरून कळून आल्याशिवाय राहणार नाही. आपल्या पुरातन अस्सल संहितांचीही पुनर्बांधणी या दृष्टीकोनातून होणे अगत्याचे आहे. यात आपल्या पूर्वसूरींचा अपमान करण्याचा आततायी हेतू निश्चितपणे नाही. संशोधन हे बिनचूक व्हावे याकरिंता हे अपरिहार्य आहे. त्या कवींवर अजाणता झालेला अन्याय दूर करण्याच्या हेतूने तरी हे अत्यावश्यक आहे. एखादी व्याधी झाली असता कुशल शल्यचिकित्सक शरीराचा विशिष्ट भाग काढून टाकण्याकरिंता शस्त्रक्रिया करतो. याही संदर्भात हीच दृष्टी महत्त्वाची ठरते. आपण योग्य प्रकारे अभ्यास करून या ग्रंथांचे उचित अर्थनिर्वचन केले तर आपल्याला न्याय मिळाल्याचे समाधान लाभून या संतकवींना स्वर्गात आनंद झाल्यावाचून राहणार नाही, हे तेवढेच खरे.

बोलीच्या अनुषंगाने संतसाहित्याचा अभ्यास करण्याचे आणखी एक उद्दिष्ट

म्हणजे या अभ्यासामुळे त्या कवींचे मूळ स्थान उलगडून दाखविता येऊ शकते. म्हणजे तुकारामांची गाथा अभ्यासली असता तिच्यात येणारे अनेक शब्द कठीण म्हणून संपादकांनी परिशिष्टात दिलेले दिसून येतात. वास्तविक देहू परिसरात भटकंती केली असता तेथील शेतकरी खेडुतांच्या जिभेवर ते शब्द आजही खेळत असल्याचे आढळून येईल. त्यावरून तुकाराम देहूचेच हे आपणास सिद्ध करता येऊ शकते. कवीने स्वतःच्या परिसरातील बोलींचे शब्द आपल्या ग्रंथात जागोजागी पेरून ठेवले असताना त्या कवीचा स्थलशोध घेण्यास्तव अन्य उपायांची काय आवश्यकता?

या प्रमेयाचा व्यत्यासदेखील आपण करू शकतो. म्हणजे ज्या कवींच्या स्थलासंदर्भात मतभेत असतील त्या कवींच्याच ग्रंथातील शब्द, व्याकरणविशेष आणि क्रियाविशेष इत्यादी गोळा करून त्या प्रदेशात ते आढळतात अथवा नाही याचा शोध घेणे, वेगवेगळ्या प्रदेशात आढळणारे हे विशेष संकलित करून ज्या प्रदेशात आजही हे विशेष ग्रामीणांच्या बोलण्यात आढळून येत असतील त्या प्रदेशातील तो कवी असावा या निष्कर्षाप्रत आपल्याला येऊन पोहोचता येते. असा प्रयोग मी 'विवेकसिंधू'च्या नवीन संपादनात आद्यकवी मुकुंदराजांच्या संदर्भात केला आहे. भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली व गोंदिया या झाडीपट्टीच्या परिसरात बोलल्या जाणाऱ्या झाडीबोलीचे अनेक विशेष मुकुंदराजांच्या आत्माविष्कारात आढळून येतात, असे मी शंभरांच्यावर उदाहरणे देऊन सिद्ध केले आहे. त्यावरून आद्यकवी मुकुंदराज यांचे वास्तव्य झाडीपट्टीतील वैनगंगेच्या तीरावरील अंभोरे येथेच होते हे सिद्ध होत असल्याचा निर्वाळा प्रसिद्ध अभ्यासक व वक्ते प्राचार्य राम शेवाळकर आणि डॉ. म. रा.जोशी यांनी दिला असून संकृत विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. पंकज चांदे आणि प्रा. श्री.मा. कुळकर्णी यांनीदेखील त्यास दुजोरा दिला आहे.

या संदर्भात मुकुंदराजांची 'विवेकसिंधू' मधील एक ओवी वानगीदाखल पाहू.

'लवण पाणियाचा बांधा । हा कीरूरु जगीं प्रसीद्धा
परी त्रुषर्ता सेवितांसिद्धा । मरण आसे ॥' (विवेक ७-७०)

या ओवीतील 'लवण' या शब्दाचा 'खारट' असा अर्थ घेतल्यामुळे कशी गल्लत झाली आहे पहा. "खारट पाण्याचा बांध म्हणून जगात प्रसिद्ध असलेल्या जलाशयात मृत्यू अटळ आहे" या स्पष्टीकरणाला काहीच अर्थ नाही. पाणी खारट असो की शुद्ध डिस्टिल वॉटर असो, खोल पाण्यात गेल्यास बुडून मृत्यू येणारच

हे सांगायला कोणा विद्वानाची आवश्यकता नाही. येथे 'लवण' या शब्दाचा 'खोल' किंवा 'सखल' हा झाडी बोलीतील पर्याय स्वीकारला असता तर योग्य झाले असते. पुन्हा या ओवीत आलेला 'बांध' हा शब्द जलाशय किंवा सरोवर या अर्थाने केवळ झाडीपट्टीतच वापरला जातो. लोणारचे सरोवर प्रसिद्ध आहे. पण त्यास लोणारचा बांध म्हटल्याचे ऐकिवात नाही. या उलट झाडीपट्टीत नवेगाव बांध सर्वांना माहिती आहे. शिरेगाव बांध, शिवनी बांध अशी येथील विशाल जलाशयांची नावे आहेत. त्यांच्याकरिता 'सरोवर' हा पर्याय कोणीच वापरत नाहीत. आद्यकवींनी हाच संदर्भ येथे व्यक्त केला आहे असे म्हणता येईल.

संत कवींच्या ग्रंथातील बोलीविषयक वैशिष्ट्यांचा उपयोग याव्यतिरिक्त अनेक मार्गांनी करता येऊ शकेल. एखाद्या संताच्या स्थळी आज त्याच्या ग्रंथातील कोणते शब्द 'जिवंत' आहेत याचा अभ्यास अनेक दृष्टींनी उपयुक्त ठरू शकणारा आहे. नरहरी सोनार, सावता माळी, गोरा कुंभार, नामा शिंपी अशा विविध जातींमधील या संतांच्या काव्यात त्या त्या जातीतील शब्द आलेले आहेत. त्यांचा वेगळा अभ्यास करून हे व्यावसायिक पारिभाषिक शब्द कसे बदलत गेले याचा एक आलेख अभ्यासकाला काढता येऊ शकेल. प्रचारात नसलेले काही शब्द आजही प्रचारात आणण्याची आवश्यकता त्या त्या व्यवसायानुरूप संदर्भात कशी आहे याचे महत्त्वदेखील साधार पटवून देता येईल. संतसाहित्याच्या अभासाची ही एक वेगळी 'सामाजिक फलश्रुती' ठरू शकेल.

नामदेवांच्या बाबतीत तर याच्याही पुढे जाऊन आपले संशोधनकार्य करू शकतो. समान भाषिक वळण असलेल्या अभंगांची निवड करता येऊ शकेल. ज्ञानेश्वरांच्या समूहातील नामदेव, विष्णुदास नामा आणि आणखी तिसरा नामा असे तीन नामदेव आमचे गुरू डॉ. सु. बा. कुलकर्णी यांनी भटकंती करून परिश्रमपूर्वक साधार प्रतिपादले आहेत. बोलीच्या अभ्यासाच्या या पद्धतीचा अवलंब केला तर सांप्रत नामदेवांच्या नावावर असलेल्या सर्व अभंगांची वाटणी आपल्याला या तीन नामदेवांमध्ये करणे शक्य होईल. त्यामुळे सुबांच्या कार्याला बळकटी येऊन त्यांचा आत्माही तृप्त करण्याचे पुण्य संशोधकांना आपल्या पदरात पाडून घेता येईल.

म्हणजे बोलीचा वापर करून एखाद्या संताच्या कृतीचा अभ्यास केल्यास तिहेरी लाभ होणार आहे. त्या संताचे मूळ स्थान आपल्याला कळून तर येतेच. शिवाय एकाच संताच्या संदर्भात स्थळांचा दावा करण्यात आल्यास त्या संदर्भात निर्वाळा देता येतोच, शिवाय एकाच नावाचे अनेक संत असल्यास त्यांच्याही

काव्यकृतींची वाटणी करून देता येऊ शकते. याशिवाय अन्य अनेक आनुषंगिक लाभ आहेत ते वेगळेच. त्या संतानी आपल्या ग्रंथात वापरलेला शब्द आता ज्या स्वरूपात उपलब्ध आहे ते परिवर्तन कसे घडून आले असावे, याचाही अभ्यास आपल्याला या पद्धतीने करता येऊ शकेल. ज्ञानेश्वरांसारख्या शब्दप्रभूंचे शब्द महाराष्ट्राच्या सर्वच बोलींमध्ये आढळून येतात. त्यांचा तौलनिक अभ्यास करून ज्ञानेश्वरांच्या भावार्थदीपिकेची लोकप्रियता कशी होती हे आपणास साधार सिद्ध करता येऊ शकेल. विशिष्ट भागातील त्या शब्दांचे आधिक्य विचारात घेऊन यासंबंधीचा एक आदर्श नकाशा तयार करता येईल. यात प्रादेशिक अभिनिवेश महत्त्वाचा नाही, केवळ शास्त्रीय अभ्यासाला अग्रस्थान आहे हे अभ्यासकाने विसरता कामा नये.

आजही अनेकांजवळ आपल्या प्राचीन ग्रंथाच्या हस्तलिखित संहिता उपलब्ध आहेत. त्या वाळवींच्या भक्ष्यस्थानी जाण्याच्या पूर्वी त्यांचे संकलन करून त्यांचा भाषिक संदर्भ विचारात घेता कवीला अभिप्रेत शब्दांचा अर्थ त्या त्या बोलीच्या अनुषंगाने आपल्याला लावता येईल. त्यामुळे आपले हे वाङ्मयीन संचित खऱ्या अर्थाने भाविक आणि डोळस अशा दोन्ही दृष्टिकोनातून अभ्यासले जाण्याची संधी या पद्धतीमुळे प्राप्त होणार आहे. भाविकांना आणि रसिकांनाही योग्य अशी सार्थ संहिता उपलब्ध करून दिल्यामुळे त्यांचेही समाधान होणार आहे.

बोलीच्या संदर्भातील हा अभ्यास केवळ महाराष्ट्रापुरताच मर्यादित राहील असे नाही. तिकडे उत्तर भारतातील संत तुलसीदास, सूरदास, कबीर, मीराबाई इत्यादींच्या कृतींचे अध्ययन या पार्श्वभूमीवर करता येईल. किंबहुना भारताची सीमा ओलांडून शेक्सपिअर, बर्नार्ड शॉ, शेले, कीट्स्, बायरन प्रभृती पाश्चिमात्य साहित्यिकांच्या संदर्भातही प्रस्तुत कसोटी वापरून त्यांच्या परिसरातील बोलींच्या पार्श्वभूमीवर वेगळ्याप्रकारे अध्ययन करता येऊ शकेल. प्रत्येक भाषेला स्वतःच्या बोली असतात आणि या बोलींचा प्रभाव त्या परिसरातील साहित्यिकाच्या साहित्यकृतीवर अवश्यमेव पडलेला असतो हे सत्य एकदाचे स्वीकारल्यानंतर त्या अभ्यासाच्या कक्षा रुंदावण्याला कोणताच प्रत्यवाय असू नये. म्हणजेच जागतिक वाङ्मयाच्या संदर्भातही आपल्याला प्रस्तुत पद्धतीचा अवलंब करता येईल. त्या संशोधनानंतर हाती लागणारे निष्कर्ष निश्चितपणे महत्त्वाचे आणि आश्चर्यात टाकणारे असतील यात संशय नाही. संशोधनाला क्षितिज हीच सीमा असते याचा प्रत्यय याही क्षेत्रात येईल.

बोलीच्या अनुषंगाने आद्यकवी मुकुंदराज यांच्या 'विवेकसिंधू' या ग्रंथाचा अभ्यास मी केला आहे. तो अभ्यास करताना काही मार्गदर्शक तत्त्वे आपोआपच आकारास येत गेली. त्यातूनच मी स्वतःच्या समजुतीनुसार ही पद्धती सिद्ध करीत गेलो. याच विचारमंथनातून मला काही मुद्दे मांडावेसे वाटले. त्यांचे संकलन व आकलन येथे सविनय सादर केले आहे. यात कोणताच आग्रह अथवा अभिनिवेश नाही. यातून भाषाशास्त्राच्या अभ्यासाची नवी शाखा निर्माण होऊ शकेल काय याचा मी शोध घेत आहे. अशी शाखा विकसित केल्यास तिला कोणते नाव द्यावे याचाही विचार सुरू आहे. या संदर्भात संबंधित अभ्यासकांनी मार्गदर्शन करावे असे नम्र आवाहन आहे. एक नवीन विचार पूर्णत्वास येण्याच्या दृष्टीने मार्गदर्शन व्हावे एवढाच या लेखनप्रपंचाचा हेतू आहे.

■

रेंगेपार (कोहळी), पो. सडक पिंपळगाव, ता. लाखनी, जि. भंडारा ४४१ ८०४.

## शब्द आणि वाक्य

आत्मकेंद्री आणि केवळ अभ्यासाकडं उन्मुख असलेल्या लेखकांमध्ये बऱ्याचदा नवीन शब्द शोधण्याची, नवीन शब्द निर्माण करण्याची प्रवृत्ती दिसून येते. त्याच्या कलाकृतीत असे शब्द इतरांपेक्षा वेगळ्या वैशिष्ट्यांनी चमकताना दिसतात. कित्येकदा तर असंही होतं की शब्दच त्याच्या कलाकृतीत प्रमुख बनतात. हे शब्दच त्याची ओळख बनतात आणि एका मर्यादेपर्यंत त्याला कैदेत सुद्धा ठेवतात.

जीवनाकडं पाहणाऱ्या लेखकांमध्ये शब्दांपेक्षा वाक्य प्रमुख असतं. भर्तृहरीनं तर आपल्या 'वाक्यपदीय' मध्ये पूर्ण कवितेला एक महावाक्यच म्हटलं आहे. 'त्रिलोचनं' यांच्या कवितेतही आणि बोलण्यातही या वाक्यावर फार जोर असतो. ते नेहमी असं म्हणतात, 'एक पूर्ण वाक्य लिहा.'

वाक्यच पुढं जाऊन वाक्प्रचाराचं रूप घेतं. जीवनाकडं पाहणाऱ्या कलाकृतीमध्ये वाक्प्रचाराचं प्रमाण अधिक असतं. किंबहुना त्यातून नवीन वाक्प्रचारांचा जन्म होतो.

इथं येताना नवीन शब्दसुद्धा जीवनाच्या भट्टीत तावून सुलाखून येतात आणि स्वतःचं स्थान तयार करूनच वाक्यामध्ये प्रवेश करतात.

■

**संदर्भ - "कवीच्या डायरीतील काही पानं"**
**मूळ हिंदी कवी राजेश जोशी. अनुवाद : बलवंत जेऊरकर, 'अभिधानंतर'**
**जाने. ते जून २००३, पृ.२५**

# भाषेची सभ्यता

रोशन

कुठलीही नवी भाषा शिकली, की ती वापरून बघायची खुमखुमी असते. पण आपल्या आजूबाजूला ती भाषा जाणणारे कोणी नसले म्हणजे जाम पंचाईत होते. मी जेव्हा जपानी शिकायला लागले, तेव्हा ही पंचाईत तर फारच व्हायला लागली. त्यातून आमच्या शिक्षिका नवीन विचारसरणीच्या. आम्हांला पाचदहा वाक्य यायला लागल्यापासून आम्हांला बोलायला, संवाद करायला त्या उद्युक्त करायच्या. मग आम्ही एकमेकांशीच बोलायचो. पण हे बोलणे म्हणजे एकमेकांच्या व्याकरणाच्या चुका पकडायच्या संधी मिळवणे असेच व्हायचे. त्यामुळे त्यात फारशी मजा यायची नाही. त्यातून समोरच्यालाही आपल्या इतकीच दहाबारा वाक्य येत असायची, म्हणजे मग त्यातून काही नवीन शिक्षणही व्हायचे नाही.

अशा परिस्थितीत, एका प्रवासात जेव्हा एक जपानी माणूस भेटला, तेव्हा मी त्याचा चक्क ताबाच घेतला आणि अत्यंत भोचकपणे जपानी भाषेतून त्याच्या अन् त्याच्या देशाच्या चवकशा चालवल्या. पण पठ्ठ्याने मला चारी मुंड्या चीत केले. मी मारे जपानीतून त्याच्या अंगावर सरासर प्रश्न फेकत होते. पण तो त्याची उत्तरं मात्र स्वतःच्या बोबड्या इंग्रजीतूनच देत राहिला. अर्थातच ह्याचा दुष्ट आनंद माझ्या कुटुंबियांना झाला. माझ्या जपानीची टर उडवायची आयती संधी चालून आली ना! त्यांनी माझी यथेच्छ चेष्टा केली. "ही त्याला त्याचं नाव विचारायची, की तो आपल्या गावाचं नाव सांगायचा असला प्रकार चालला होता. असं हिचं जपानी!" त्यामुळे अर्थातच मला त्या जपान्याचा बख्खळ राग आला.

पण कधीकधी एखाद्या कोड्याचं उत्तर नंतर अनपेक्षितरीत्या सापडतं, तसं माझं ह्या बाबतीत झालं आणि तो जपानी माणूस तसं का वागला असेल ह्याचा बोध झाला. पुढच्या कुठल्यातरी धड्यात एक तळटीप सापडली. 'तू' साठी जपानीत 'अनाता' असा शब्द वापरतात. पण धड्याखालच्या तळटीपेत लिहिले होते की, खऱ्याखुऱ्या संभाषणामध्ये हा शब्द वापरायचा नसतो, त्याऐवजी एकतर 'ओ'

वापरायचे असते किंवा समोरच्याचे नाव घेऊन त्यास संबोधायचे. म्हणजे, "तुला (किंवा तुम्हांला) कॉफी हवीय का?" असं न विचारता "अंजली सानना कॉफी हवीय का?" असं विचारायचं असतं. 'अनाता' असं संबोधणे अगदीच असभ्यपणाचं लक्षण आहे. फक फक..... लख्ख अशी माझी एकदम ट्यूबच पेटली. मी माझ्या जपानी बकऱ्याच्या चांभारचवकश्या करताना सारखं त्याला 'अनाता' असंच संबोधलं होतं. म्हणूनच व्याकरणदृष्ट्या सहन करण्याजोगं असलं तरी माझं जपानी त्याच्या अंगावर शहारे, काटे, रोमटे असलं काहीबाही उठवून गेलं असणार आणि त्यामुळेच माझं जपानी थोपवून धरायला त्यानं इंग्रजीचा आश्रय घेतला असणार.

ह्यावेळेस मला माझ्या एका दिल्लीस्थित मैत्रिणीच्या आईंची आठवण झाली. काही वर्षांसाठी मैत्रिणीच्या वडलांची पुण्याला बदली झाली होती. तिच्या आईंनाही चटकन कुठेतरी शाळेत नोकरी मिळाली. त्यानंतर त्या भेटल्या तेव्हा मी त्यांच्या शाळेची चवकशी केली, 'त्या त्यांच्या शाळेत रूळल्या का? शाळेत जाणेयेणे कसे करतात? इ. तर त्या एकदम उसळल्याच. "ये पूना के कंडक्टर्स बडे बत्तमीज है । मुझे 'तू तू' करते है और 'ए बाई' बुलाते है ।"

मला एकदम मामला लक्षातच आला. कारण ती माझी मैत्रीण तिच्या धाकट्या भावाच्या पाठीत रट्टा घालतानासुद्धा, "आप हमारी बात मानते क्यूं नहीं?" असली 'अहोजाहो' वाक्यं टाकायची. त्या घरातल्या पोक्त बाईला "तू तू" ऐकणं म्हणजे काय झालं असेल. त्यातून 'बाई' ही उपाधी उत्तरेकडल्या लोकांमध्ये फक्त वारांगनांच्या कोठीमालकीणीलाच देतात. म्हणजे तर त्या बसकंडक्टरच्या असभ्यपणाचा कडेलोटच होता. मी आपला माफक प्रयत्न केला, मराठी भाषेचा बाज त्यांना समजावून द्यायचा. पण त्यांना ते सर्व काही पचलं नव्हतं. 'ऐसी कैसी भाषा' असं म्हणून त्यांनी ते सोडून दिलं होतं.

जपानी अन् इंग्रजी, हिंदी अन् मराठी हे तर प्रमुख भाषाबद्दल झाले. पण एकाच भाषेत निरनिराळ्या प्रांतातले सभ्यतेचे नियम निरनिराळे असतात. आता माझंच उदाहरण घ्या ना. पश्चिम महाराष्ट्रात लहानाची मोठी झाल्यावर मी लग्न होऊन मराठवाड्यात आले. लक्षात आलं की तिकडल्यासारखं इथे चटकन एकमेकांना एकेरीतून संबोधत नाहीत. औपचारिकपणा फार काटेकोरपणे पाळतात. मग मीही लक्षपूर्वक सर्वांना 'अहो जाहो' करायला लागले. पण इतर लोक मला 'अहो जाहो'. पण इतर लोक मला 'अहो जाहो' करत त्याचं काय?' विशेषतः नव्यानेच प्रवेश घेतलेल्या प्रोफेशनल असोसिएशनमध्ये जेव्हा माझ्यापेक्षा

वयानं, मानानं, ज्ञानानं मोठी असलेली माणसं माझ्यासारख्या नुकतीच विद्यार्थीदशा पार पाडलेल्या मुलीला 'अहो मॅडम' म्हणायला लागली, तेव्हा मला उगाचच अंगावर सुरकुत्यांचं जाळं चढल्यासारखं वाटायला लागलं होतं आणि मी असोसिएशनमध्ये पहिला ठराव मांडला होता की, "मला सर्वांनी चक्क नावानं हाक मारायची."

मग पुढे मला आणखी एक गंमत लक्षात आली. इथल्या मराठीवर हैदराबादच्या संबंधांमुळे हिंदी-उर्दुची सावली, म्हणूनही अहो जाहोची जनरीत. पण इथल्या हिंदीवर मराठीचा साया. म्हणून हिंदीत मात्र 'तेरेकु, मेरेकु'चा प्रादुर्भाव.

माझ्या वडलांचा एक पारशी विद्यार्थी घरून जाताना माझ्या आईला आवर्जून हाक मारून, "मी येतो" असं सांगून जायचा आणि माझ्या आईला दरवेळेस भरून यायचं, "बघ गं तो परभाषिक मुलगा तुमच्यापेक्षा जास्त उत्तम रीतीने मराठीची भाषिक सभ्यता पाळतो."

तर अशी ही भाषेची सभ्यता!

■

**चिनार, ४९ सावरकरनगर, सिडको-एन५, दक्षिण औरंगाबाद ४३१ ००३.**

## 'शिळे' आणि 'उष्टे'

ऐश्वर्या पाच सहा वर्षांची. शाळेचा आनंद मनात भिनण्यासारखे काही कार्यक्रम शाळेत आयोजित केले गेले होते. त्यादिवशी शाळेला लवकर जायचे होते. आंघोळ करून जाण्याएवढा वेळ नव्हता. म्हणून तिच्या आईने तिला शाळेतून आल्यावर आंघोळ करायला सांगितले. मग ऐश्वर्या लगेच म्हणाली,

"मी काय शाळेला शिळीच जाऊ काय?"

तिचाच भाऊ अक्षय. वय वर्षे दहा. ऐश्वर्याला एकदा कांजिण्या झाल्या होत्या. डॉक्टरांच्याकडे तिला नेलं, तेव्हा अक्षयही तिच्याबरोबर होता. डॉक्टरांनी अक्षयला तिच्यापासून दूर ठेवायला, वेगळं झोपवायला सांगितलं. अक्षयनं डॉक्टरांचं सांगणं अगदी कटाक्षानं पाळलं. इतकं की त्यानं तिला जवळसुद्धा घेतलं नाही. पण एक दिवस झोप आवरता आली नाही म्हणून ती त्याच्या गादीवर झोपली. त्याची झोपायची वेळ झाली तेव्हा तो आला आणि ती त्याच्या गादीवर झोपलेली बघून जाम चिडला आणि म्हणाला,

"ऐश्वर्यानं गादी सगळी उष्टी करून टाकली."

■

**प्रेषक - मानसी अ. यार्दी, धारवाड**

**पुस्तक परीक्षण**

# आदिवासींची भाषा आणि 'ढोल'

**सुनीता ज. जोशी**

(परीक्षित अंक : 'ढोल' मराठी वार्षिकांक, 'भाषा आदिवासींची : समस्या-विचार, उच्चार, कृती, विशेषांक दिवाळी २००२, मूल्य : १२५/- पृष्ठे १७२)

'ढोल' या नावापासूनच आपला वेगळेपणा दाखविणारा हा मराठी वार्षिकांक दिवाळी २००२, हा अंतरंग व बहिरंग दोन्ही दृष्टींनी वाचकांना चांगलाच प्रभावित करतो. गुजरात राज्यातील बडोदा या शहरातील भाषा संशोधन-प्रकाशन केंद्राने तो प्रकाशित केला आहे. आकर्षक मुखपृष्ठ, उत्कृष्ट कागद व छपाई यामुळे अंक पाहिल्यावरच वाचावासा वाटतो 'भाषा आदिवासींची-समस्या-विचार, उच्चार, कृती विशेषांक' असे या वार्षिकांकाचे शीर्षक आहे. केवळ आदिवासी जीवनाविषयी माहिती-समस्या, मार्गदर्शन यांच्यासाठी असणाऱ्या या नियतकालिकाचा हा तिसरा वार्षिकांक आहे ही निश्चितच कौतुकाची बाब आहे विशेष म्हणजे या अंकात एकही जाहिरात नाही.

या अंकात एकूण तीन विभाग आहेत समस्या - विचार, उच्चार आणि कृती. समस्या-विचारमध्ये एकूण १३ लेख व दोन सूची यांचा समावेश आहे. यातील ९ लेख भाषांतरित आहेत उच्चार विभागातीलही बरेच लेख भाषांतरित आहेत. आदिवासी भाषेतून मराठी भाषेत केलेले. पण त्यामुळे आदिवासी प्रश्नांविषयी, भाषांविषयी आस्था, आपुलकी असणाऱ्या मराठी वाचकांची खूप सोय झाली आहे हे निश्चित.

अंक अथपासून इतिपर्यंत वाचल्यानंतर सर्वात प्रथम मनात आले, ते म्हणजे संपादिका अरुणा जोशी (बऱ्याच लेखांचे भाषांतरही त्यांनीच केले आहे) यांचे अभिनंदन करण्याचे! भाषा व्यवहार, वर्चस्वभाषा, व्यवहार भाषा, लोकभाषा आदी भाषिक प्रश्नांना हात घालणारी त्यांची छोटी, अतिशय मुद्देसूद आणि परखड अशी 'भूमिका', "चांगली सुरुवात म्हणजे निम्मे काम यशस्वी" याची प्रचीती आणून देते. सध्या समाजात इंग्रजीला असलेल्या प्रतिष्ठेची कारणमीमांसा करताना

त्या इंग्रजांना दोषी धरत नाहीत. उलट त्या लिहितात, "इंग्रजी अंमलामध्येसुद्धा लोकांच्या भाषेवर, भाषा संस्कृतीवर जाणीवपूर्वक बंधने वा मर्यादा घातल्या गेल्या असे नाही. किंबहुना, शासन व व्यवस्था सुकर करण्यासाठी का होईना, पण एतद्देशीय भाषा शिकून त्या भाषांमध्ये व्यवहार करणे इंग्रज अधिकाऱ्यांनी व राजवटीने व्यवहार्य मानले होते. मात्र, त्याच राजवटीच्या प्रभावांतर्गत आलेली शिक्षणपद्धती आणि पाश्चात्य समाज व्यवस्थेच्या माहितीचा प्रभाव भारतीय उच्चभ्रू-प्रतिष्ठित वर्गावर, इंग्रजी-शिक्षित बुद्धिमंतांवर एवढा खोलवर पडला, की त्यांची स्वतःच्याच समाज व मूल्यांकडे पाहण्याची वृत्ती, दृष्टिकोन पार बदलून गेलेला दिसतो." इतकेच नाही तर तत्कालीन भाषापंडित व राजकारणी यांच्याबाबतीत त्या म्हणतात, "एकभाषिकता हे मूल्य निर्विवादपणे स्वीकारलेल्या या पिढीतल्या परस्परविरोधी भूमिका घेणाऱ्या दिग्गजांनी स्वतंत्र भारताच्या भाषिक नीतीची चर्चा करताना एकमेकांना कडाडून विरोध करत, आव्हाने देत एकच भूमिका एकभाषिकतेची - स्वीकारलेली आज जाणवते. महात्मा गांधींच्या चिंतनात एकभाषिकतेऐवजी स्थानिक / प्रादेशिक भाषांच्या वापराचा विचार आढळतो. त्या पलीकडील लोकभाषांचा विचार तर त्या काळात कोणाही नेत्याला फारसा त्रास देताना आढळत नाही. महात्मा गांधींच्या महात्मतेमुळे, घटनाकारांच्या दीर्घदृष्टीमुळे किंवा निवडणुकांवर आधारित राजकारणाच्या दबावांमुळे, पण स्वतंत्र भारतात संपूर्ण एकभाषीयतेऐवजी निदान काही प्रादेशिक भाषांना तरी अधिकृत मान्यता मिळाली, हा काही अंशी दिलासा!"

"आदिवासी कोण?" या डॉ. अजय दांडेकरांच्या लेखातील, 'आदिवासी कोण या प्रश्नाचे उत्तर आदिवासींनी द्यायचे नसून आपण द्यायचे आहे' विकासाच्या ओढीने आपण देशातील संस्कृतीचे जतन करणाऱ्यांच्याच समोर अस्तित्वाचा प्रश्न उभा केला आहे." हे त्यांचे विधान विचारप्रवृत्त करणारे आहे.

"आदिवासींच्या प्रश्नाची भाषिक बाजू" डॉ. अशोक रा. केळकर, पुणे, "हरवत चाललेल्या भाषा" (भाषांतरित) रोझमेरी ओस्लर, ओरेगॉन, यू.एस.ए.; "आदिवासी व अल्पसंख्यांक भाषांच्या विकासासाठी भाषिक नीती" अनुवादित प्रा. बी. रामकृष्ण रेड्डी, हैदराबाद, "साक्षरता व मौखिकता यातील परस्परसंबंध आजच्या वास्तवाच्या संदर्भात" (अनुवादित) प्रा. लछमन खूबचंदानी, पुणे हे लेख व त्यांचे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे भाषाशास्त्रज्ञ असे लेखक त्या त्या विषयांच्या संदर्भात मोलाची माहिती सांगतात, मार्गदर्शन करतात. भाषाविषयक प्रश्नात रस

असणाऱ्यांनी ते लेख मुळातूनच वाचणे अधिक चांगले!

"संस्कृत भाषेतील चैतन्य आणि तिचे सातत्य" या पं. जवाहरलाल नेहरू यांच्या अनुवादित लेखात त्यांची संस्कृत भाषेविषयीची मते व्यक्त झाली आहेत. "मातृभाषेचे महत्त्व" या अनुवादित लेखातील म. गांधींचे विचार स्वातंत्र्याच्या वेळीच कार्यान्वित झाले असते तर आज वेगळाच भारत दिसला असता. इंग्रजी भाषेमुळे "राष्ट्राच्या आत्मशक्तिचा" ऱ्हास होत असून तो थांबविण्यासाठी, "प्रादेशिक भाषांना त्यांचे हक्काचे आसन बहाल झालेच पाहिजे. रोजच्या रोज चक्रवाढीने फुगत जाणारी बेताल नुकसानी सहन करण्यापेक्षा तात्पुरती अनागोंदी मला पत्करेल. प्रांतिक भाषांचा सन्मान आणि बाजार-पत यात बढावा यावा यासाठी कोर्टकचेऱ्यांची भाषा त्यांच्या त्यांच्या प्रांतातील प्रचलित भाषाच असली पाहिजे असा माझा आग्रह राहील. प्रांतिक विधिमंडळाचे कामकाजही तेथील भाषेतच चालले पाहिजे. एखाद्या प्रांतात एकाधिक भाषा प्रचलित असतील तर त्याही भाषांना कामकाजासाठी मुभा दिली पाहिजे." म. गांधींच्या या विचारांची आजच्या राज्यकर्त्यांनी गंभीरपणे दखल घेण्याची गरज आहे.

डॉ. भगवानदास पटेल यांच्या "माझ्या संशोधनाची दिशा-लोक" या लेखात त्यांनी गुजरातच्या खेडब्रह्मा आणि दांत या तालुक्यात लोकसाहित्याचे संशोधन करत असताना आलेल्या अडचणी, अनुभव यांचे कथन केले आहे हा लेखही अनुवादित आहे. "उद्याचा दिलासा देणाऱ्या लोककला" हा डॉ. नंदकिशोर तिवारी यांचा अनुवादित लेख! आजच्या वैश्विकीकरण प्रक्रियेत लोककलांची होत असलेली आबाळ ही त्यांची खंत आहे. एकूणच "लोककला ही कोणा एका व्यक्तीची नसून ती संपूर्ण समाजाच्या व समूहाचा आवाज प्रकट करते. माणसाच्या अस्मितेला व्यक्त करते वैश्विकीकरणाच्या दुष्ट आक्रमणापासून तिला वाचवून, संवेदनशीलतेने तिच्याशी आपलेपणाचा भाव निर्माण करण्याची मात्र गरज आहे" असा विचार ते आग्रहाने मांडतात. ख्यातनाम मल्याळम् कवी प्रा. के. सच्चिदानंद यांच्या "आजच्या काळात आदिवासी साहित्याचे अगत्य" या अनुवादित लेखातील "आदिवासी साहित्य हे जीवनवादी आहे. निसर्ग, संस्कृती आणि इतिहास हे त्याचे मुख्य प्रेरणास्रोत आहेत." हे त्यांचे विधान आदिवासी साहित्याचा अभ्यास करायला प्रवृत्त करतील असे वाटते.

"प्रत्येक भाषा ही आपल्या परीने एक स्वतंत्र व निराळे विश्व असते आणि अशी कित्येक विश्वे हातातून निसटून देऊन आपण कदाचित निव्वळ शब्दांच्या पलीकडले फार काही गमावून तर बसणार नाही?" ही खंत व्यक्त केली आहे

पायल संपत यांनी "अखेरचे शब्द" या लेखात! त्यांनी जगातील विविध भागातील भाषांची संख्या, त्यांचे भाषक, भाषालोपाचा दर इत्यादी माहितीही या लेखात दिली आहे. त्यामुळे ज्ञानात भर तर पडतेच, पण त्याहूनही अधिक म्हणजे ती माहिती आपल्याला अंतर्मुख करते.

"पोटभाषेची प्राथमिकता" या लेखात डॉ. गणेश देवी म्हणतात, "मान्य भाषांच्या अस्तित्वाची व प्रगतीची गुरुकिल्ली पोटभाषांच्या हाती आहे. भारतीय समाजात आजही अशा असंख्य पोटभाषा तग धरून आहेत आणि गेल्या तीन हजार वर्षात अखंडितपणे भारतीय संस्कृतीचा प्रवाह वाहात ठेवण्याचे महान कार्य या भाषांनी केले आहे. प्रवाहाचाच विचार करायचा झाल्यास किनारे म्हणजे मान्य भाषा व प्रवाहाची गती म्हणजे पोटभाषा. त्यांना न रोखणे न दुर्लक्षित करणे हे त्या प्रवाहासाठी योग्यच ठरेल" हे जरी खरे असले तरी सध्याच्या वैश्विकीकरणाच्या प्रक्रियेत, माहिती तंत्रज्ञानाच्या युगात किनारे शाबूत राहिले तरी पुष्कळ! त्यानंतर घटनेतील मान्य भाषा व भारतातील आदिवासी भाषा (२१४) यांच्या सूची दिल्या आहेत. अभ्यासकांना त्या निश्चितच उपयोगी ठरतील. भारतातील आदिवासी भाषांची सूची ॲन्थ्रोपोलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियाच्या 'पीपल ऑफ इंडिया' मधून संकलित केली आहे.

यानंतर अंकाचा दुसरा विभाग आहे "उच्चार" यामध्ये एकूण १५ लेख आहेत. त्यापैकी सात लेख हे कुंकणा, पावरा, अहिराणी, पंचमहाली भिली, देहवाली भिली, चौधरी आणि भांतु या भाषातून प्रसिद्ध होणाऱ्या 'ढोल' या पहिल्या अंकाच्या संपादकांचे मनोगत अनुवादित स्वरूपात आहेत. या भाषांतून लेखन करण्याचे, आपल्याला मिळालेला वारसा पुढे चालवण्याचे आवाहन सर्वच संपादकांनी केले आहे. "भाषा आणि संस्कृती" सोनल राठवा व "एका शिक्षकाची कैफियत" प्रा. धीरुभाई पटेल या लेखातून मातृभाषेचे महत्त्व, तिची उपयुक्तता यांचा ऊहापोह केला गेला आहे. "देहवाली भिली भाषा" या चामुलाल राहवा यांच्या लेखात देहवाली भिली भाषेचे स्वरूप, तिच्यावर इतर भाषांचा असणारा प्रभाव आणि देहवाली भिलीचे संक्षिप्त व्याकरण-लिंग-वचन-काळ यांचे सोदाहरण विवेचन केले आहे. "चौधरी लोकबोली" या एल. के. चौधरी यांच्या लेखाची रचनाही तशीच आहे. "भिलोरी आणि पावरी भाषेत विभक्तीरचना" राजबन्सी मोतीराम वळवी, "मथवाडी भाषेची ओळख" - चामुलाल राठवा, "खानदेशी आदिवासी कोकणी भाषेची ओळख" - बळवंत वसावे, "अहिराणीची उत्पत्ती" - डॉ. सुधीर

देवरे हे चार लेख आणि आधीचे दोन असे सहाही लेख शीर्षकात नमूद केलेल्या आदिवासी भाषांची - त्यांच्या उपभाषेची ओळख करून देतात. भाषाशास्त्राच्या अभ्यासकांना, संशोधकांना व विद्यार्थ्यांना या लेखातून बरीच उपयुक्त माहिती मिळते कदाचित कुणाला त्या त्या भाषांचा तपशीलवार अभ्यास करण्याची प्रेरणा मिळेल, कुणाला तौलनिक अभ्यास करण्याची! असे झाले तर त्याचे श्रेय असेल या लेखकांना आणि अंकाच्या संपादकांना!

या अंकाचा तिसरा भाग आहे - "कृती" - कृती यामध्ये कोकण आदिवासी भाषेतील "कनसरी" कथा "कुणबी व कन्सरी" कथा, "धनस्या कुळंबी", ही वारली भाषेतील, "रेवा नदी" ही पावरा भाषेतील - अशा विविध कथा आहेत. शिवाय देहवाली भिलीतील काही कविताही आहेत 'मंडोळ' नावाच्या भिल्ल जीवनावर आधारित गुजराती लघुकादंबरीच्या एका अंशाचा मराठी अनुवादही आहे विशेष म्हणजे आदिवासी भाषांतील कथा कवितांचा मराठी अनुवादही त्या त्या ठिकाणी दिला आहे. मराठी वार्षिकांक असल्यामुळे तसे केले असावे. मराठी वाचकांची त्यामुळे सोय झाली आहे. ही साहित्य-शिदोरी कशी आहे ते वाचकांनीच ठरवावे.

शेवटी साहित्य अकादमी सन्मान, भाषा सन्मान व पारिभाषिक शब्दसूची दिली आहे तीही उपयुक्त आहे.

अंकाच्या सुरवातीला असलेल्या 'भूमिके'बद्दल वर लिहिले आहेच. ही भूमिका संपादकांनी लिहिली आहे. त्यामुळे या अंकाचे स्वरूप, त्याचे उद्दिष्ट यांचा उल्लेख यायला हवा होता अंकाच्या स्वरूपावरून 'ढोल' हे नियतकालिक अन्य आदिवासी भाषातूनही प्रकाशित होते. त्याचा उल्लेख, तसेच मागच्या दोन विशेषांकांचे विषय यांचा उल्लेख केला असता तर हा अंक प्रथमच बघणाऱ्यांना ही माहिती उपयुक्त ठरली असती. तसेच अंकात आदिवासी जीवनाशी संबंधित अशी सुंदर छायाचित्रे आलेली आहेत. ती छायाचित्रे कशाची आहेत याचा उल्लेख मराठी वाचकांना उपयुक्त ठरला असता.

एकंदरीतच महत्त्वाच्या विषयावर, विविध माहिती देणारा सर्वांगसुंदर अंक पाहिल्याचे, वाचल्याचे समाधान 'ढोल' आदिवासींचे नियतकालिक, मराठी वार्षिकांक २००२ ने दिले यात शंका नाही त्याबद्दल संपादकांचे व सर्व लेखकांचे मन:पूर्वक अभिनंदन!

■

**'संवाद', २८/३२७ गंगानगर, निगडी, प्राधिकरण, पुणे-४११ ०४४.**

**दखलपात्र**

# भाषांतराबाबत पुनश्चिंतन

**कुयंपरंबत सच्चिदानंदन**

वॉल्टर बेन्यामिन ओर्तेगा - इ - गास्सेत, रोमान याकोबसन आणि जॉर्ज स्टायनर यांच्यापासून तरी 'भाषांतर' ही आंतरविद्याक्षेत्रीय अभ्यासाची एक महत्त्वाची शाखा म्हणून विकसित झाली आहे आणि आज या विषयानं भल्याभल्या अभ्यासकांचं लक्ष आपल्याकडे वेधून घेतलं आहे. निव्वळ एक वाङ्मयीन घटित म्हणून नव्हे तर सांस्कृतिक - राजकीय घटित म्हणूनही भाषांतराचा विचार केला जातो. आपल्यासारख्या वसाहतकालोत्तर संदर्भात, प्रतिनिधित्व, सत्ता आणि ऐतिहासिकता यांचे प्रश्न उपस्थित करण्यासाठी आणि लोकसमूह, वंश आणि भाषा यांच्यामधील असमरूपता आणि विषमता यांचा योग्य उलगडा करण्यासाठी भाषांतर व्यापार हा अगदी अर्थपूर्ण प्रश्नमंच ठरतो.

भाषांतरमीमांसेच्या अभ्यासकांनी अलीकडे बरेच महत्त्वाचे प्रश्न उपस्थित केले आहेत : निर्णय करण्याच्या प्रक्रियेत भाषांतराचे अंतःसंबंध कसे असतात? भाषांतर क्रियेशी निगडित असलेली अनुरूपता किंवा सममूल्यता हिंची तत्त्वे कोणती? प्रमाण किंवा अस्सल मूलकृती म्हणून काही असते का आणि त्यातूनच निघणारा दुसरा प्रश्न म्हणजे 'लेखकाची एकमात्र वाणी अशी काही असते का? मूळ अर्थाच्या म्हणून हाती काही नसल्यानं 'प्रमाण' भाषांतर असू शकतं का? भाषांतर म्हणजे निव्वळ अनुकृती आहे का की स्वत्वात जो परत्वाचा अंश असतो त्याच्याशी संवादी राहण्याची जोखीम पत्करण्याची जबाबदारी देखील जिच्यात अनुकृती म्हणून धरावी लागते. भाषांतराची अर्थनिर्णयप्रक्रिया कोणती? एका बहुपेढी वाङ्मय व्यवस्थेअंतर्गत भाषांतरित साहित्याचं नेमकं स्थान काय असतं? सुसंगती आणि सलगता या बाबतीत भाषांतरात कोणते बदल होतात? भाषांतर म्हणजे एका संस्कृतीचा अंतर्गत लेखनव्यवहार की आंतरसांस्कृतिक आदानप्रदान व्यवहार? भाषांतर म्हणजे आंतरराष्ट्रीय समाज निर्मितीची खटपट, जणू एका आदर्श समाजाकडे नेणारा मार्ग? की नेमकं त्या उलट भाषिक - सांस्कृतिक भेदांचं

अनावरण? भाषांच्या श्रेणीव्यवस्था भाषांतरात कोणती भूमिका बजावतात? भाषांतर अव्वल वाङ्मयाच्या भांडाराची उभारणी, फेररचना, किंवा मोडतोड कसं काय करतं? लक्ष्य भाषेतीत साहित्यावर भाषांतरांचा काय परिणाम होतो? वाचनाचे आणि समीक्षेचे दंडक भाषांतरामुळे कसे बदलतात? वसाहतवाद आणि भाषांतर व्यापार यांच्यातील संबंधांचे स्वरूप काय? उदाहरणार्थ, इंग्रजीत भाषांतर करण्यासाठी परकी राज्यकर्त्यांनी जी भारतीय पाठ्यं निवडली ती कशी, त्यांत त्यांनी असं काय पाहिलं? भाषांतर आणि प्राच्य विद्येमागची वैचारिक प्रणाली यांच्यात काय संबंध आहे? भाषांतर म्हणजे दुसऱ्या भाषेतील पाठ्यं आपल्या भाषेत रिचवणं आणि त्या वेगळ्या संस्कृतीचं स्वतःमध्ये शोषण करणं अशी स्वजातिभक्षक क्रिया तर नव्हे? की, चिंता आणि तणावग्रस्त गाठभेट? भाषांतराची नीती अशी कोणती? अभ्यासकांना कदाचित या प्रश्नांना नवीन, वेगळी उत्तरं मिळू शकतील आणि जे भारतातील भाषांतर व्यापाराच्या स्थितीकडे, आणि भाषांतर क्रियेकडे पाहण्याचा भारतीय दृष्टिकोण विकसित होण्याच्या शक्यतेकडे विशेष लक्ष देतील.

आपण भारतीय सगळ्या व्यवहारांमध्ये पावलोपावली भाषांतराचा आश्रय घेत असतो. आपण पूर्वापार द्विभाषिक किंबहुना बहुभाषिक-असल्यामुळे आपल्या रोजच्या बोलण्यातसुद्धा सहजगत्या भाषांची सरमिसळ होते. आपलं साहित्यही भाषांतराच्याच पायावर उभं आहे. रामायण, महाभारत, भागवत हे ग्रंथ घेतले तरी वेगवेगळ्या भाषांमध्ये, अगदी आदिवासी भागांमध्येही त्यांची रूप वेगवेगळी आढळतात. लोककलांचे खेळिये त्यांत आयत्यावेळी उत्स्फूर्त बदल करतात. हे संचितच आपल्या समृद्ध वाङ्मय परंपराचा आधार आहे. मूलकृती आणि तिचं भाषांतर हा भेदसुद्धा वसाहतपूर्व भारतीय साहित्यात पुसट आणि अनिश्चित होता. पंप, कंबन, एळुताचन, मोला, प्रेमानंद, एकनाथ, बलरामदास, तुलसी, कृतिवास किंवा माधव कंदली यांच्या रामायणांना आपण स्वतंत्र कृतीच मानत आलो आहोत, भाषांतर किंवा रूपांतर मानत नाही कारण त्या त्या भाषेतले ते स्वतंत्र प्रज्ञाप्रतिभेचे उन्मेष होते. अभिजात कृतींची अनुसर्जनं, रूपांतरं, पुनःकथनं, विवरणं, संक्षेप, विस्तारीकरणं यांचा वृत्तान्त हीच वास्तविक पाहता १९ व्या शतकापर्यंतच्या भारतीय भाषांची कहाणी आहे. खेरीज, संस्कृत, फार्सी, अरबी व आधुनिक भारतीय भाषा यांच्यात आपापसात झालेल्या भाषांतरांनी तर वेगवेगळे समाजगट, भाषा, धर्म आणि संस्कृती यांना एकत्र गुंफलेलं आहे. याउलट, वसाहतवाद्यांच्या

भाषांतर उपक्रमात, वसाहतवाद्यांना अनुकूल असलेली मनोभूमिका निर्माण करायचा प्रयत्न होता. सत्तेचे - ज्ञानाचे तंत्र आणि आचार यांच्यामार्फत त्यांनी हे केले. मग भाषांतर हा वसाहतीला आपल्या अंकित ठेवण्याच्या आणि अंकित लोक आणि त्याची जीवनपद्धती म्हणजे एक इतिहास नसलेली जीवन्मृत परंपराच आहे असे आक्रमक रीतीने बिंबवण्याच्या डावपेचाचा भाग झाला. आज आपल्याला भाषांतरक्रियेला पुन्हा तिचा वसाहत कालपूर्व खुलेपणा मिळवून द्यायचा आहे. तसेच, आपल्या समाजाच्या इतिहास-परंपरांचे साधन, समाजाचा भूतकाळ आणि वर्तमानकाळ यांच्या नोंदीचे साधन या दृष्टीने भाषांतराकडे आपण पाहिले पाहिजे.

भाषांतरसिद्धान्तांवर आजपर्यंत मोठ्या प्रमाणावर पगडा आहे तो पाश्चात्य संस्कृतीतील भाषांतरकृर्तींचा आता मात्र या सिद्धांत आणि उपयोजनाचा पौर्वात्य सांस्कृतिक संदर्भात पुनर्विचार करायची गरज आहे, कारण या भूमीवर त्यांची छाननी अजून झालेली नाही. भाषांतरकार्याची तपासणी वसाहतकालोत्तर संदर्भचौकटीत धोरण, अग्रक्रम, सबलीकरण, समृद्धीकरण, संस्कृतिआकलन या दृष्टीने व्हायला हवी आहे. कारण संस्कृती-संस्कृतीमधल्या संबंधांची उभारणी संस्कृतीच्या अतीव अशा सौंदर्याच्या अमूर्त सार्वत्रिक सिद्धांतावर होत नसते; ती होते भिन्न संस्कृतींच्या साक्षात प्रतीतीमधून. भाषांतर म्हणजे या वेगळेपणाला दाद देणं, सांस्कृतिक पृथगात्मतेचा नव्यानं शोध घेणं. अनिर्वचनीय काय, निर्वचनीय काय यांमधल्या रूढ सीमा पुसून नव्याने आखणं, तुलनेनं जवळचं काय दूरचं काय याबद्दलचा विचार फिरून तपासणं या मार्गांनी भाषांतर क्रिया सांस्कृतिक सत्त्वाची घडण करत असते.

भाषांतरक्रियेची सैद्धांतिक मांडणी करताना पाश्चात्य दृष्टिकोन आणि भारतीय दृष्टिकोन यांच्यातील वेगळेपणाची आपण जाण ठेवली पाहिजे. जे. हिलिस मिलर या अमेरिकन समीक्षकाच्या मते भाषांतर म्हणजे "देशोधडीला लागलेल्याचं भटकं जिणं." (मानवाचं पतन आणि त्याची स्वर्गातून हद्दपारी या बायबलमधील मिथला अनुलक्षून ते हे म्हणत आहेत हे उघड आहे.) इथे भाषांतर ही हद्दपारी. बाबेलच्या मनोऱ्याची मिथ पुढे या कल्पनेला दुजोरा देते, मुळातल्या सर्वांना समान अशा एकाच भाषेला मुकावं लागल्यावर माणसाला बहुभाषिकत्वाचा शाप मिळालेला आहे. आपण भारतीय मात्र बहुभाषिकत्वाचा स्वीकार करून शेकडो वर्षांपासून नांदत आहोत, एवढेच नव्हे तर एका भाषेतून दुसऱ्या भाषेत संक्रमण हे आपल्याला "वासांसि जीर्णानि यथा विहाय" इतकं स्वाभाविक आहे. आपले कबीर काय किंवा

मीराबाई काय, नानक घ्या नाहीतर विद्यापती, हे सगळे संतकवी बहुभाषिकच होते आणि त्यांच्या ती सहज पचनी पडलेली गोष्ट होती. स्वर्गातून पतन ही भीती आपल्या बाबतीत संभवत नाही. भाषांतराचा आपल्याला कसला संकोच? ती तर रतीइतकी नित्याची आणि अंगवळणी पडलेली गोष्ट. आपला पिंड पूर्वापार भाषांतरावर पोसलेला आहे. त्याउलट युरोप आणि तिथल्या एकभाषी वाङ्मयीन संस्कृती, भाषांतर म्हटलं की काहीशा अवघडतात. शिवाय मूलकृतीपासून वेगळं असणं याला आपण पतन समजत नाही. रामायणाचंच उदाहरण पाहा. रामायणाच्या वेगवेळ्या भाषांतरकर्त्यांच्या कल्पनास्वातंत्र्याला आपण दाद दिलेली आहे. या सगळ्या रामायणांमधला वेगळेपणा त्यांच्यातील साम्यस्थळांपेक्षा अधिक महत्त्वाचा मानला जातो, कारण त्या वैधर्म्यांमुळेच ह्या कवींना त्या त्या भाषांमधले स्वतंत्र प्रतिभेचे कवी हे स्थान मिळालं. एवढेच नव्हे तर त्या त्या भाषांचा पाया रचणारेही कित्येकदा हेच कवी ठरले. पाश्चात्यांनी भाषंतर मुळाबरहुकूम असणं याचीच नेहमी चिंता वाहिली. बरेचदा त्याचा अर्थ 'शब्दशः भाषांतर' असाच होता. तंतोतंत अनुकरणातून मूलकृतीच्या पुनर्वसनाचा प्रयत्न. प्लेटोच्या अनुकृतीला जवळची संकल्पना. प्लेटोचा सोळाव्या शतकातला फ्रेंच भाषांतरकार एतियेन दॉले (Etienne Dolet) यानं मूलकृतीपासून स्वातंत्र्य घेतलं म्हणून त्याचा शिरच्छेद करण्यात आला. भारतात मात्र भाषांतरापायी असे हुतात्मे झालेले नाहीत. वरील उदारहणाचा आपण कित्ता गिरवला असता तर आपण आपल्या उत्तमोत्तम कवींना देहान्तशासन फर्मावलं असतं. 'मूल' कृतीपासून भाषिक तसंच बौद्धिक स्वातंत्र्य सर्वार्थानं घेणाऱ्या संतकवींना तसंच महाकाव्यांच्या कर्त्यांनाही. किंबहुना, 'मूल' पाठ्य ही कल्पनाच आपल्याला परकी आहे, कारण आपली परंपरा मौखिक आहे आणि परिवर्तन हाच मौखिक पाठ्याचा स्थायिभाव असतो.

पूर्वेतील वसाहतींना आपल्या अंकित ठेवण्यासाठी व त्यांच्यावर हुकमत गाजवण्यासाठी म्हणून युरोपन पौर्वात्य ग्रंथांच्या भाषांतराचा मार्ग अवलंबिला. तर भारतानं भाषांतराच्या माध्यमातून आपल्या संस्कृतीचा भूतकाळ आणि वर्तमान यांच्यात; तसेच आपली संस्कृती आणि इतर भूभागांमधली संस्कृती यांच्यात जिवंत संवाद राखायचा प्रयत्न केला. आपल्या दृष्टीनं भाषांतर म्हणजे वेगळ्या स्थलकालातील लेखकानं आपल्या कल्पनाशक्तीनं केलेलं मूलकृतीचं नवसंजीवन. भाषांतर हे आपल्या दृष्टीनं वाङ्मयपाठ्यांचे परस्परसंस्कारित असण्याचे (इंटर टेक्स्ट्युॲलिटी) रूप आहे. मूलपाठ्याला काही विशेषाधिकार आहेत, आणि म्हणून

त्याचं तंतोतंत अनुकरण करायचं असे मानलं गेलेलं नाही. कोणत्याही वाचनक्रियेप्रमाणेच भाषांतरक्रियाही आंतरपाठ्यसंस्करितेच्या अनिश्चित शक्यतांनी बांधली जाते आणि तिची सोडवणूकही तिथे होते. भारतात भाषांतरकाराचं स्थान दुय्यम कधीच नव्हतं. आपल्याकडचे श्रेष्ठ कवी भाषांतरकार आहेत आणि श्रेष्ठ भाषांतरकार हे कवी. भर्तृहरिंपासून-देरिदाच्या कित्येक शतके आधीपासून आपण मानत आलो आहोत की, भाषेत अर्थाची प्रत्यक्ष उपस्थिती नसते, भाषेत अर्थ अभावरूपाने नांदत असतो, त्यावरून त्याची निरपेक्ष उपस्थिती सूचित होते. थेट स्फोटसिद्धांताच्या काळापासूनच भारतीय भाषाविज्ञानाला मूलकृतीला मुकल्याच्या चिंतेनं कधीच घेरलेलं नाही. मूलकृतीतील बदलांबद्दल आपण नुसते सहिष्णु आहोत असं नव्हे तर अशा बदलांचं स्वागत झालेलं आहे, त्यांना प्रोत्साहन दिलं गेलेलं आहे.

भाषांतरासाठी संस्कृतमध्ये असलेले शब्दच बघा : *विवर्त.* वेदान्तात तो *रूपांतर भास* या अर्थी वापरला जातो; जसे, जग म्हणजे ब्रह्माचा विवर्त. *परिभाषा, भाषण,* विवक्षित भाषाव्यवहार, कान उघाडणी, सामान्य नियम असे त्याचे विविध अर्थ होतात. *भाषांतर* म्हणजे वेगळ्या भाषेत सांगणे, दुसऱ्या भाषेतील अवतार. *अनुवाद* म्हणजे अर्थाला अनुसरून पुनरावृत्ती. भाषांतराच्या संदर्भात मध्ययुगीन काळात *अनुकृती* (नक्कल) *अर्थक्रिया* (चरितार्थ होणे) व्यक्तिविवेक (आवृत्ती पण व्यक्तिसापेक्ष फरकाने) आणि तमिळमध्ये उलुराइ (म्हणजे गर्भितार्थ) हेही शब्द वापरले जात होते. यातला एकही शब्द 'ट्रान्स्लेशन' या इंग्रजी शब्दाचा समतुल्य प्रतिशब्द नाही, एवढेच नव्हे तर, मूळकृती आणि लक्ष्य यांचा प्रकृतिधर्म एकसाची, एकरूप नसतो याचीच हे सर्व शब्द साक्ष देतात. आपल्या महाकाव्यांच्या भाषांतरांच्या बाबतीत भाष्य किंवा स्थानिक संदर्भातलं विवरण ही सर्रास घडणारी गोष्ट होती. वसाहतपूर्व काळात आपल्याकडे एखाद्या पाठ्याचं भाषांतर म्हणजे त्याच संस्कृतीत पण वेगळ्या भाषेत केलेला अनुवाद अशी परिस्थिती नव्हती तर तो विविधतेला वाव देणारा दोन पाठ्यांचा परस्परसंघात होता. अडसर निर्माण झाले ते परकीयांच्या आपल्यावरील सत्तेमुळे. तथाकथित मूलकृतीपासून दूर गेल्याची, पतनाची अपराधी जाणीवही त्यातूनच निर्माण झाली. आता आपलं कर्तव्य आहे ते, भाषांतरकर्त्याला "सहृदय वाचक आणि मूलकृतीच्या लेखकाच्याच तोलामोलाचा सर्जक" हा त्याचा मूळचा वसाहतपूर्वकाळातला दर्जा मिळवून देणं हे. हे करत असतानाच आपल्याला भाषांतराच्या आजच्या काळातल्या संदर्भचौकटींचंही भान ठेवलं पाहिजे : भाषांतरकर्ता कोण आहे? कोणत्या कृतीचं

भाषांतर करायचं हे कोण ठरवतं, कोणाच्या अनुभवाला भाषांतरात स्थान मिळतं? पाठ्याचा लेखक कोण आहे? अपेक्षित वाचकवर्गाची घडण कशी आहे, कोण करतं? या कृतीतील सापेक्ष घटकांचे ऐतिहासिक स्थान काय? संदर्भ किंवा नित्शेची संज्ञा वापरायची तर 'प्रभावकारी इतिहास' हा भाषांतरक्रियेचा अंगभूत आणि अत्यावश्यक भाग ठरतो.

■

मूळ इंग्रजीवरून अनुवाद : विजया देव.

मूळ संदर्भ : 'रीथिंकिंग ट्रान्सलेशन', इंडियन लिटरेचर, पूर्णांक २०१:५-८.

(साहित्य अकादमीचे सचिव आणि मळ्यालम भाषेतील कवी कुयंपरंबत सच्चिदानंदन यांची भेट 'भाषा आणि जीवन'च्या वाचकांना यापूर्वी कवितारूपाने झालेली आहे. 'कवितेचा अनुवाद म्हणजे' पावसाळा १९८६ (अनुवादक : अशोक रा. केळकर) केळकरांनीच दुसऱ्या काही कवितांचाही अनुवाद केला आहे. 'कविनिधनाच्या प्रसंगी', 'कवितारती' दिवाळी १९९९ - संपादक)

**लेखकाचा पत्ता : सचिव, साहित्य अकादमी, ३५ फिरोजशहा मार्ग, नवी दिल्ली - ११० ००१.**

**अनुवादिकेचा पत्ता : ९ प्रिया, ९ वरळी सीफेस, मुंबई ४०० ०२५.**

## "मुलांचं वाचन ही भविष्यकाळासाठी गुंतवणूकच."

मुलं भावसमृद्ध व्हायला हवी असतील, त्यांच्यात विचार स्वातंत्र्य निर्माण व्हायला हवं, तर त्यांना वाचतं करायला हवं. वाचन ही भविष्यकाळासाठी गुंतवणूक आहे. आयुष्यात पुस्तकांसारखा सोबती नाही. जीवनाच्या प्रत्येक टप्प्यात ती साथ देतात. आयुष्य किती वैविध्यपूर्ण असू शकतं, याची जाणीव पुस्तकांमधूनच होते. घरातून किंवा प्रवास करताना प्रत्येक वळणावर आकाशाचे वेगवेगळे तुकडे दिसतात आणि अचानक एखाद्या क्षणी मोठं क्षितिज समोर येतं, वाचनाचंदेखील असचं आहे. मुलांना वाचनातून जीवनाची कितीतरी रूप दिसतात. त्यांच्या अनुभवाचं क्षितिज रुंदावतं. मुलांना हा अनुभव पालकांनी जरून द्यावा. त्याला बागेत सहलीला, सर्कस बघायला नेता तसं ग्रंथप्रदर्शन, पुस्तकमेळा बघायला न्या. त्याला केवढी पुस्तकांची संपत्ती एकत्र बघायला मिळेल! आजच्या जगात सामान्यज्ञान खूपच आवश्यक बाब ठरते. ते ज्ञान पुस्तकवाचनातून मिळतं. भाषा, जीवन यांच्या जाणिवा वाढतात.

■

**अनिल गोडबोले**

**('साप्ताहिक सकाळ', १४ जून २००३, पृ. १७.)**

# इतिवृत्त

मराठी अभ्यास परिषदेची दुसरी विशेष साधारण सभा रविवार दि. २९ जून २००३ ला पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या सभागृहात ठीक ४.३० वाजता घेण्यात आली. अध्यक्षस्थानी प्रा. प्र.ना. परांजपे होते. (संस्थेचे अध्यक्ष डॉ. अशोक केळकर प्रकृतीअस्वास्थ्यामुळे हजर राहू शकले नाहीत.) कार्यवाह नीलिमा गुंडी यांनी उपस्थितांचे स्वागत केले व सर्वानुमते मंजूर होणाऱ्या ठरावांना आपली मान्यता कळवणारे डॉ. सु. रा. चुनेकरांचे पत्र वाचून दाखवले. त्यानंतर दि. ९-२-०३ च्या विशेष साधारण सभेच्या (ज्या सभेत परिषदेची दुरुस्त घटना मंजूर झाली होती) इतिवृत्ताचे वाचन करण्यात आले. ते इतिवृत्त मंजूर करण्यात यावे, हा ठराव प्रा. ल.ना.गोखले यांनी सुचविला व डॉ. गं.ना. जोगळेकर यांनी त्याला अनुमोदन दिले. हा ठराव सभेने एकमताने मंजूर केला. त्यामुळे मराठी अभ्यास परिषदेच्या दुरुस्त घटनेवर शिक्कामोर्तब झाले. (परिषदेची ही नवी घटना १ जुलै २००३ पासून अंमलात येत आहे.) प्रा.प्र.ना. परांजपे यांनी अध्यक्षीय समारोप केला. आभार प्रदर्शनानंतर सभेचे कामकाज संपले. या सभेनंतर चहापानाच्यावेळी आजीव सदस्यांनी परस्परांचा परिचय करून घेतला.

त्यानंतर त्याच ठिकाणी ठीक ५.३० वाजता परिषदेची सातवी वार्षिक सर्वसाधारण सभा प्रा. प्र.ना. परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात आली. सुरुवातीला या सभेत गतवर्षी दिवंगत झालेले परिषदेचे आजीव सदस्य वसंत गोगटे (पुणे) प्रमोद देव (नागपूर) तसेच लोकप्रिय कवी सुरेश भट आणि लेखिका गौरी देशपांडे यांना एक मिनिट स्तब्ध उभे राहून श्रद्धांजली वाहण्यात आली.

कार्यवाह नीलिमा गुंडी यांनी सहाव्या वार्षिक सर्वसाधारणसभेचे इतिवृत्त सादर केले. ते एका ठरावाद्वारे मान्य करण्यात आले. त्या ठरावाला अरविंद नवरे हे सूचक होते व सुधा गोवारीकर अनुमोदक होत्या. त्यानंतर कार्यवाहांनी गतवर्षीचे कार्यवृत्त सादर केले. गेल्या वर्षभरातील महत्त्वाच्या उपक्रमांमध्ये डॉ. अशोक केळकर गौरव चर्चासत्र (दि. १ व २ मे २००२, विषय : 'भाषिक नीती आणि व्यवहार.) आणि महाबँक भाषाविषयकलेखनपुरस्कार वितरण समारंभ

यांचा समावेश होता. परिषदेच्या 'भाषाआणि जीवन' या पत्रिकेने एकविसाव्या वर्षात पदार्पण केले असून गतवर्षी वर्गणीदारांची संख्या पुढीलप्रमाणे होती. वार्षिक वर्गणीदार ९४, संस्था वर्गणीदार ५६ तसेच संस्थेच्या आजीव सदस्यांची संख्या २६८ असून १५ परदेशस्थ सदस्य असल्याची माहितीही सभागृहाला देण्यात आली. हे कार्यवृत्त मंजूर करण्याविषयीच्या ठरावाची सूचना डॉ. मो. गो. धडफळे यांनी मांडली व डॉ. मॅक्सिन बर्नसन यांनी त्याला अनुमोदन दिले.

कोषाध्यक्ष डॉ. द. दि. पुंडे यांनी २००२-२००३ चा संस्थेचा लेखापरीक्षकांनी मंजूर केलेला ताळेबंद सादर केला. एका ठरावाद्वारे ताळेबंद मंजूर करण्यात आला. त्या ठरावाची सूचना श्री. अरविंद नवरे यांनी मांडली व श्री. किसन होळकर यांनी त्याला अनुमोदन दिले. कोषाध्यक्षांनी २००३-२००४ या आर्थिकवर्षाचा संस्थेचा अर्थसंकल्प सादर केला. यंदा घेण्यात येणाऱ्या कार्यकारिणीच्या निवडणुकीसाठी रु. ५०००/- इतका निधी खर्च करण्याची तरतूद त्यात करण्यात आली होती. हा अर्थसंकल्प मान्य करण्यात यावा, अशा ठरावाची सूचना विजया देव यांनी मांडली व प्रा. ल. ना. गोखले यांनी त्याला अनुमोदन दिले. येत्या आर्थिक वर्षासाठी लेखापरीक्षक ए. जे. दिघे तसेच कायदेविषयक सल्लागार म्हणून ॲड. विनय देशपांडे यांची नेमणूक करणारा ठराव विजया चौधरी यांनी मांडला. मृणालिनी शहा यांनी त्याला अनुमोदन दिले.

अध्यक्षांच्या परवानगीने झालेल्या आयत्यावेळच्या विषयांवरील चर्चेत काही सूचना पुढे आल्या. सुधा गोवारीकर यांनी मराठी विषय घेऊन बी.ए. वा एम. ए. ला प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यास पारितोषिक देण्यात यावे, असे सुचविले. मॅक्सिन बर्नसन यांनी इंग्रजी माध्यमांच्या शाळांमधील विद्यार्थ्यांसाठी वक्तृत्वस्पर्धा घेण्याचा उपक्रम सुचवला. ही स्पर्धा फक्त इंग्रजी माध्यमापुरती न ठेवता सर्व अमराठी माध्यमाच्या शाळांसाठी खुली असावी, असे मत डॉ. धडफळे यांनी मांडले. मराठी माध्यमातून शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांची व पालकांची मनोगते मागवण्याची कल्पनाही यातून पुढे आली. शेवटी प्रा. प्र. ना. परांजपे यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यवाहांनी आभार मानल्यांनतर सभेचे कामकाज संपले.

■

# इ-डाक का नाही बरे?

**संदर्भ :** भाषा आणि जीवन २१:३ पावसाळा २००३ पृ. ५०वर मनोहर राईलकर e-mail/E-mail साठी ई-डाक प्रतिशब्द सुचवत आहेत.

यातल्या मेल ऐवजी डाक हा प्रतिशब्द अचूकच वाटतो. मात्र e/E ऐवजी इ हा प्रतिशब्द हे कसे काय बरे? e/E हे electronic चे संक्षिप्त रूप, electronic ला मराठी विश्वकोशात इलेक्ट्रॉनिकीविषयक हा प्रतिशब्द, तर मग e-mail ला प्रतिशब्द इ-डाक का नाही बरे?

**डॉ. सुरेश नाडकर्णी, मुंबई.**

मूळ e-mail (मूळ E-mail नाही!) चे लिप्यंतर करून ई-मेल शब्द मराठीत आला आहे, तो इ-मेल कसा नाही असा प्रश्न डॉ. नाडकर्णींच्या मनातही आला नाही हे पाहण्याजोगे आहे.

माझा प्रतिप्रश्न असा आहे : एंजिनियरिंग (किंवा रूढीने इंजिनियरिंग) मधला ए (किंवा इ) आणि बी.ई. मधला ई मराठीत एकत्र नांदतात ना? त्यात विसंगती वाटत नाही. का वाटत नाही? तर ए आणि ई दोघांचा साक्षात् संबंध नाही. तर ए चे मूळ एंजिनियरिंग, एंजिनियरिंग चे मूळ engineering, engineeringचा संक्षेप E., E. चे लिप्यंतर ई. इतकी लांबलचक साखळी मध्ये आहे. म्हणजे संबंध दूरान्वयाचे आहे.

ई-डाक मधला ई आणि इलेक्ट्रॉनीविषयक डाक मधला इ यांचा संबंध साक्षात् नाही, त्यांच्या दरम्यान एक लांबलचक साखळी आहे. (ती कोणती हे 'भाषा आणि जीवन'चे सुज्ञ वाचक आता सहज हुडकू शकतात!) त्यामुळे मराठीत ते दोन्ही एकत्र नांदायला काहीच हरकत नाही. त्यात विसंगती वाटायचे कारण नाही. ■

**अशोक रा. केळकर, पुणे.**

# भाषा आणि जीवन : वर्ष २१,२००३ची लेखन सूची

## लेखक सूची

**लेख सूची**

■

१. **'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. १ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे आहेत.

वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५ फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५० फक्त

व्यक्तीला रु. १०० फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ४५० फक्त

२. **आजीव वर्गणी :**

मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/-. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील **वाढीव रक्कम रु. ४००/- भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.**

३. **पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता अंक याचा उल्लेख करावा.

**वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

३. **मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

५. **प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाउसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतरमीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

६. **जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान रु. ७५०/- , अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/-, शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन / चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

